# इस्लाममध्ये सक्तीचे धर्मांतर नाही

## (जिहाद आणि जिझियाची वस्तुस्थिती)

लेखक

**अबू मुहम्मद इमामुद्दीन**

अनुवाद

**शाहजहान मगदुम**

# अनुक्रमणिका

*''अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे.''*

## विषय - परिचय

सर्व स्तुती, प्रशंसा व कृतज्ञता अल्लाहसाठीच आहे आणि अल्लाहच्या सर्व पैगंबरांवर अल्लाहची अपरंपार दया व कृपा असो.

इस्लामचा प्रारंभ मक्केत झाला. इस्लामला आपल्या सुरूवातीच्या काळातच निधर्मी आणि आचारहीन विरोधकांना तोंड द्यावे लागले. मक्केचे रहिवासी अतिशय धर्मभ्रष्ट व आचारहीन होते. त्यांनी सुमारे १३ वर्षे इस्लामचा विरोध केला आणि पैगंबर मुहम्मद (स.) व मुस्लिम देशत्याग करून मदीनेला गेल्यानंतरदेखील युद्धाद्वारे इस्लाम व मुस्लिमांचे उच्चाटन करण्याचा प्रयत्न ते करीत राहिले. मदीनेभोवती ज्यूंच्या वस्त्या होत्या. तेदेखील इस्लामचे विरोधक बनले. कालांतराने इराण व रोमचे साम्राज्य इस्लामचे शत्रू म्हणून उदयास आले. इस्लाम यूरोपमध्ये पोहोचल्यानंतर ख्रिश्चनांनी इस्लामविरुद्ध दुष्प्रचार करण्यास सुरूवात केली. इंग्रज भारतात आल्यानंतर त्यांनी तेच गैरसमज येथे पसरविले. भारतातील रहिवाशांमध्ये स्वामी दयानंद यांच्यासारख्या धर्मपंडितांनी आणि यदुनाथ सरकार यांच्यासारख्या इतिहासकारांनी इस्लामविरोधी भ्रष्ट साहित्याचा प्रचार केला.

इस्लामच्या विरोधकांनी ज्या विषयांना अनुसरून दुष्प्रचार केला त्यात 'जिहाद' व 'जिझिया' हे दोन विषय महत्त्वाचे आहेत. इस्लाम मुस्लिमेतरांना बळजबरीने मुस्लिम बनविण्याचा आदेश देतो. तसेच बळानेच इस्लामचा प्रसार झाला आणि मुस्लिमेतरांवर कर लादून त्याद्वारे त्यांना इस्लाम स्वीकारण्यास विवश केले जाते, हाच 'जिझिया'चा मुख्य उद्देश होता, असा दुष्प्रचार केला जातो.

हे पुस्तक वाचल्यानंतर आपल्या लक्षात येईल की 'जिहाद' आणि 'जिझिया'ची वस्तुस्थिती काय आहे आणि विरोधक करीत असलेला प्रचार किती भ्रष्ट, द्वेषमूलक आणि निराधार आहे. हे पुस्तक सर्वप्रथम १९४५ साली प्रकाशित झाले होते. 'अमारते शरिया' बिहार व ओरिसा यांनी ते दुसऱ्यांदा प्रकाशित केले होते. त्यात फक्त 'जिहाद'ची वस्तुस्थिती सांगण्यात आली होती. त्यानंतर तिसऱ्या आवृत्तीत हा विषय आणखी विस्तृत करण्यात आला आहे. त्याचबरोबर 'जिझिया'च्या वस्तुस्थितीवरदेखील प्रकाश टाकण्यात आला आहे. त्यामुळे या पुस्तकास आपल्या विषयात परिपूर्णता प्राप्त झाली आहे.

स्वतंत्र भारताची मागणी आहे की इस्लामविरुद्ध करण्यात आलेल्या दुष्प्रचाराचे निवारण केले जावे, हिंदू-मुस्लिम एकता स्थापित व्हावी आणि दोन्ही धर्मांच्या अनुयायींनी एकत्र येऊन नास्तिकांपासून धर्माचे रक्षण करावे हेच या देशाचे सर्वांत मोठे वैशिष्ट्य आहे. देशात हिंदू-मुस्लिम एकता स्थापित होऊन देश समृद्ध बनेल.

- अबू मुहम्मद इमामुद्दीन

## प्रकरण १

# जोरजबरदस्तीने धर्मांतर आणि इस्लाम

जगातील ज्यू व ख्रिश्चन या दोन संप्रदायांशी इस्लामचा सर्वप्रथम संबंध आला. इस्लामचे केंद्र मदीना शहराच्या आसपास ज्यू लोकांच्या मोठमोठ्या वस्त्या होत्या आणि अरबांवर त्यांचा मोठा प्रभाव होता. ख्रिश्चनांच्या विशाल साम्राज्याचे क्षेत्र मदीनावासियांच्या सीमेपर्यंत पसरले होते. त्यांच्या प्रभावामुळे लाखो अरब ख्रिस्ती बनले होते. सीमावर्ती विभागात काही अरब राज्येदेखील स्थापित झाली होती. यमनमधील नजरान प्रांत ख्रिश्चनांचे केंद्र होते.

ज्यू आणि ख्रिश्चनांनी आपापल्या धर्मांचे योग्य प्रकारे पालन केले असते आणि आपापल्या धर्मग्रंथानुसार वागले असते तर दोन्हीही समुदाय मुस्लिम असायला हवे होते, कारण इस्लामचा सिद्धान्त आणि इतिहासानुसार जगातील विविध देशांत व जातींमध्ये जे काही ईश्वदूत, पैगंबर आणि संदेशवाहक होऊन गेले, त्या सर्वांनी इस्लामचीच शिकवण दिली होती आणि याच दृष्टिकोनातून लोकांचे मार्गदर्शन केले होते. आदरणीय मूसा (अ.) आणि आदरणीय इसा (अ.) देखील त्यांच्यापैकीच होत. परंतु ज्यू आणि ख्रिश्चन यापैकी एकाही संप्रदायाने आपल्या ईशदूताने दिलेल्या शिकवणींचा अवलंब केला नाही. ज्यूंनी 'तौरात'कडे तर ख्रिश्चनांनी 'इंजिल'कडे दुर्लक्ष केले. इतकेच नव्हे तर दोन्ही संप्रदायांच्या अनुयायींनी या ग्रंथांमध्ये फेरबदलसुद्धा केले आणि त्यांना आपल्या इच्छेनुसार व स्वार्थानुसार तयार करून घेतले.

कुरआनने इस्लामच्या सिद्धान्तानुसार 'तौरात' व 'इंजिल'ला ईश्वग्रंथ मानले आणि आदरणीय मूसा (अ.) व आदरणीय इसा (अ.) (त्यांच्यावर ईश्वराची दया व कृपा असो) ईश्वराचे संदेशवाहक असल्याचे मान्य केले. तेव्हा ज्यू आणि ख्रिश्चनांच्या धर्मगुरूंनी आपल्या स्वार्थांच्या पूर्ततेकरिता 'तौरात' व 'इंजिल'मध्ये केलेली काटछाट पुन्हा त्यात समाविष्ट केली. अशा प्रकारे ज्यू आणि ख्रिश्चनांच्या विद्वानांचे पितळ उघडे पडले. त्यांचे महात्म्य मातीमोल ठरले (धुळीस मिळाले) आणि त्यांच्या खाण्याकमविण्याचा व भोगविलासाचा अधिकार संपुष्टात आला. याच कारणास्तव ज्यू व ख्रिश्चन संप्रदाय इस्लामचे शत्रू बनणे अनिवार्य झाले.

ज्यू आणि ख्रिश्चनांच्या विद्वानांनी व धर्मगुरूंनी ईश्वराने सांगितलेले नियम व कायदे, वैध व अवैध या सर्व गोष्टी बाजूला ठेवल्या, ते ईश्वराच्या नावाखाली आपले स्वत:चे नियम व आपली आज्ञा चालवत होते. कुरआनने या दोघांच्या भ्रष्टाचाराच्या बाबतीत म्हटले आहे.

''ग्रंथधारकांच्या बहुतेक धर्मपंडित व साधूसंन्यासी लोकांची स्थिती अशी आहे की ते लोकांचा माल लबाडीने खातात आणि त्यांना अल्लाहच्या मार्गापासून रोखतात.'' *(दिव्य कुरआन, ९ :३४)*

ज्यू लोक आजच्यासारखेच त्या काळातही धनाढ्य होते. (त्यांच्या धर्मात व्याज घेण्यास मनाई करण्यात आलेली असूनदेखील ते व्याज, कपट आणि अत्याचार अशा सर्व माध्यमांतून धन कमविण्यात पटाईत होते. कुरआनोक्ती आहे,

''ज्यूं (यहुदीं) च्या व्याज घेण्याच्या वर्तणुकीमुळे ज्याची त्यांना मनाई केली गेली होती आणि अवैध रितीने लोकांचे माल खातात, आम्ही यांच्यासाठी त्या बऱ्याचशा पवित्र वस्तू निषिद्ध ठरविल्या ज्या पूर्वी यांच्यासाठी वैध होत्या.''

*(दिव्य कुरआन, ४ :१६१)*

'तौरात' व 'इंजिल'मध्ये पैगंबर मुहम्मद (स.) यांचा संपूर्ण परिचय देण्यात आला होता आणि त्या धर्मग्रंथांच्या पंडितांना व विद्वानांना हा परिचय चांगल्या प्रकारे माहीत होता. पैगंबर (स.) त्यांच्याच जातीमध्ये जन्माला येतील अशी त्यांना आशा वाटत होती. म्हणूनच ते पैगंबर (स.) येण्याची प्रतीक्षा करीत होते, परंतु पैगंबर मुहम्मद (स.) यांचा जन्म दुसऱ्या वंशात झाला त्यामुळे ज्यू आणि ख्रिश्चन दोन्ही त्यांचे विरोधक बनले. या संदर्भात कुरआनमध्ये म्हटले गेले आहे,

''ज्या लोकांना आम्ही ग्रंथ दिला आहे ते या स्थळाला (ज्याला उपासना दिशा निर्धारित केली आहे) असे ओळखतात जसे आपल्या मुलाबाळांना ओळखतात. परंतु त्यांच्यापैकी एक गट जाणूनबुजून सत्य लपवित आहे.''

*(दिव्य कुरआन, २ :१४६)*

त्यांच्यात जे सत्यप्रिय होते त्यांनी पैगंबर मुहम्मद (स.) आणि पवित्र कुरआन यांचा स्वीकार केला. त्यांच्याबाबतीत कुरआनमध्ये म्हटले आहे,

''जेव्हा ते ही वाणी ऐकतात जी पैगंबरावर अवतरली आहे तेव्हा तुम्ही पाहता की सत्याची ओळख पटल्यामुळे त्यांचे डोळे अश्रूंनी भिजतात.''

*(दिव्य कुरआन, ५ :८३)*

ज्यू समुदायाचे लोक इस्लामला क्षती पोहचविण्याकरिता वेगवेगळ्या प्रकारचे षड्यंत्र रचत असत कुरआनमध्ये आहे -

''ग्रंथधारकांपैकी एक गट म्हणतो की या पैगंबराला मानणाऱ्या लोकांवर जे काही अवतरले आहे, त्यावर सकाळी श्रद्धा ठेवा व संध्याकाळी ते नाकारा. कदाचित या युक्तीने हे लोक आपल्या श्रद्धेपासून परावृत्त होतील.'' *(दिव्य कुरआन, ३:७२)*

ज्यू धनाढ्य असूनही त्यांच्याकडे एखादे मोठे राज्य नव्हते वा सैनिकी शक्तीही नव्हती. परंतु त्यांनी आपल्या डावपेचांद्वारे मदीनेवर प्रभाव पाडला होता. आदरणीय इब्राहीम (अ.) ईश्वराचे फार मोठे पैगंबर आणि इस्लामचे प्रमुख नेता होते. त्यांनी

मक्केत एकेश्वरत्वाचे केंद्र (काबा) स्थापित केले होते. परंतु त्यांची संतती हळूहळू त्यांची शिकवण विसरून गेली होती आणि मार्गभ्रष्ट होऊन अनेक देवतांच्या पेचात पडली होती. ते लोक आपल्या या पथभ्रष्टतेमुळे सामाजिक, सांस्कृतिक आणि नैतिक पतनाच्या खाईत जाऊन पडले होते. पैगंबर मुहम्मद (स.) आदरणीय इब्राहीम (अ.) यांच्या संततीच्या त्या गोत्रात जन्माला आले जे काबाचे पुरोहित व प्रबंधक होते. परंतु मुहम्मद (स.) आपल्या आजोबांच्या धर्माचे उपदेशक व एकेश्वरत्वाचे प्रचारक होते. याच कारणास्तव त्यांच्याच गोत्राचे लोक त्यांचे सर्वांत मोठे विरोधक आणि देशभरातील विरोधकांचे नेते बनले होते आणि सैनिक शक्तीद्वारे त्यांना चिरडून टाकू इच्छित होते. मदीनेतील ज्यूंनी या लोकांशी गुप्त संबंध प्रस्थापित केले होते. त्यांची हेरगिरी करीत होते आणि सर्वतोपरी साहाय्य करीत होते. परंतु इस्लाम आपल्या बौद्धिक विश्वास, नैसर्गिक सिद्धान्त, दिव्य शिकवण, विस्तृत मार्ग आणि नैतिक आदर्शाच्या बळावर दिवसेंदिवस शक्तिशाली होत गेला. ज्यूंचा प्रभाव कमी झाला अरब पराभूत झाले, संपूर्ण देशभरात इस्लामचा प्रतिस्पर्धी नावालाही उरला नाही. अरबच्या सीमेवर ख्रिश्चनांच्या रोमन सम्राटाचे प्रभुत्व होते, त्याने इस्लामशी टक्कर दिली, त्यालाही पराभव पत्करणे भाग पडले. शाम (सीरिया) मधील रोमन साम्राज्याचा ध्वज उखडला गेला आणि ज्यू व ख्रिश्चनांचे धर्म केंद्र असलेले पॅलेस्टाइन आणि ज्यावर आदरणीय मूसा (अ.) व आदरणीय मूसा (अ.) यांचे खरे प्रतिनिधी व उत्तराधिकारी असलेल्या मुस्लिमांचा अधिकार होता तेसुद्धा मुस्लिमांच्या ताब्यात आले. अशा प्रकारे मुस्लिम सत्यधर्म ध्वज घेऊन यूरोपमध्ये पोहोचले.

खोटा प्रचार करण्याच्या बाबतीत यूरोप किती पुढे गेलेला आहे, ही गोष्ट लपलेली नाही. फार पूर्वीपासून तो या कलेत तरबेज आहे. ख्रिश्चन सम्राटांच्या तलवारी मुस्लिमांशी दोन हात करीत होत्या आणि ख्रिश्चन पोप, पाद्री व विद्वानांची वक्तव्ये आणि लेखणी इस्लामच्या विरुद्ध प्रचारात कार्यरत होती. ख्रिस्ती जनतेने इस्लाम व मुस्लिमांचे नाव ऐकणेही पसंत करू नये, हा त्या मागील मुख्य उद्देश होता. या प्रचाराद्वारे इस्लामवर जे खोटे आरोप व दोष लावण्यात आले त्यापैकी एक असा होता की इस्लाम एक खुनी धर्म आहे. तो आपल्या अनुयायांना असा आदेश देतो की त्यांनी दुसऱ्यांना बळजबरीने मुस्लिम बनवावे आणि जो मुस्लिम बनणार नाही त्याची मान कापून टाकावी. पोप, पाद्री लेखक व विद्वान या खोट्या आरोपाची एका स्वरात इतक्या तत्परतेने आणि इतके दिवस पुनरावृत्ती करीत राहिले की यूरोपचे संपूर्ण वातावरण या प्रचाराने भरून उठले आणि साऱ्या ख्रिश्चन जगतास खात्री पटली की इस्लाम एक हिंसक आणि खुनी धर्म आहे, ज्यात दया, प्रेम आणि मानवता नावालादेखील नाही.

बाहेरचे मुस्लिम आणि भारतीयां दरम्यान जी लढाई झाली ती इस्लामसाठी नव्हती. लढणाऱ्या मुस्लिमांनी आपल्या स्वार्थाकिरता या लढाया लढल्या. परंतु या लढायांमध्ये जो रक्तपात झाला त्यास इस्लामच्या माथी थोपण्यात आले. इस्लामचा या लढायांशी (काडीमात्रही) लांबचाही संबंध नव्हता.

भारतात मुस्लिमांचे राज्य संपुष्टात आले आणि यूरोपातून इंग्रजी साम्राज्य भारतात आले. तेव्हा त्याने आपल्या इतर अस्त्राशस्त्रांसह इस्लाम व मुस्लिमांच्या विरुद्ध शतकानुशतके यूरोपात पसरलेला प्रचारसुद्धा आपल्याबरोबर आणला. भारतातदेखील इस्लामविरुद्ध द्वेष व घृणा पूर्वीपासूनच अस्तित्वात होती. त्यामुळे यूरोपातून आलेल्या इस्लामविरोधी प्रचाराचे मोठ्या प्रमाणात स्वागत करण्यात आले. हळूहळू या प्रचाराने स्थायी रूप धारण केले. परंतु वास्तवता व सत्य काय आहे? याचे उत्तर कुरआनलाच विचारले पाहिजे, कारण तोच इस्लामचा मूलाधार आहे. कुरआनमध्ये कोणासही जोरबजबरदस्तीने मुस्लिम बनविण्याचा आदेश आपणास कोठेही सापडणार नाही.

कुरआनमध्ये स्पष्टपणे म्हटले आहे,

''धर्माच्या बाबतीत कोणतीही जोरजबरदस्ती नाही. सत्य असत्यापासून वेगळे केले गेले आहे. आता ज्याने कोणी तागूतचा इन्कार करून अल्लाहवर श्रद्धा ठेवली, त्याने एक असा मजबूत आधार ग्रहण केला जो कधीही तुटणार नाही. आणि अल्लाह (ज्याचा आधार त्याने घेतला आहे) सर्व काही ऐकणारा व जाणणारा आहे.''
*(दिव्य कुरआन, २ : २५६)*

या आयतीचा अर्थ मौलाना अबुल कलाम आझाद यांच्या शब्दांत असा आहे,

''धर्माच्या बाबतीत कोणत्याही प्रकारची जोरजबरदस्ती नाही, कारण त्याचा मनाशी व विश्वासाशी संबंध असतो आणि हिंसेने विश्वास निर्माण केला जाऊ शकत नाही. नि:संशय सुपथ पथभ्रष्टतेपासून अलिप्त व स्पष्ट झाले आहे आणि आता दोन्ही मार्ग लोकांसमोर आहेत. हवा तो मार्ग त्यांनी निवडावा. मग ज्याने तागूतचा इन्कार केला (म्हणजे जो विरोध व विकाराने बेजार झाला) आणि अल्लाहवर श्रद्धा ठेवली. त्याने नि:संशय (कल्याण व भलेपणाची) घट्ट फांदी पकडली. ही फांदी तुटणार नाही. ज्याच्या हाताला ती लागली त्याला पडण्यापासून संरक्षण लाभले आणि अल्लाह सर्व काही ऐकणारा व जाणणारा आहे.''

या आयतीचा जो अर्थ मौलाना आझाद यांनी सांगितला आहे तोच अर्थ इस्लामच्या प्राचीन धर्मगुरूंनी व विद्वानांनीदेखील सांगितला आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे चुलते व आदरणीय अब्बास यांचे पुत्र आदरणीय अब्दुल्लाह (रजि.)

कुरआनचे मोठे पंडित होते. त्यांच्या संतती, साहाय्यक गणांपैकी दोन पुत्र ख्रिस्ती बनले होते. त्यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांना विचारणा केली की, ‘‘माझे पुत्र ख्रिस्ती संप्रदाय सोडण्यास तयार नाहीत, मी त्यांना विवश करू शकतो काय?’’ यावर (वर उध्दृत करण्यात आलेली) आयत अवतरित झाली.

विद्वान इब्ने कसीर पवित्र कुरआनचे महान आचार्य मानले जात. त्यांनी या आयतीचा अर्थ स्पष्ट करताना जे काही लिहिले आहे त्याचा आशय पुढीलप्रमाणे आहे-

‘‘एखाद्या व्यक्तीस इस्लाम धर्मात प्रवेश करण्यास विवश करू नका, कारण तो इतका प्रकट व स्पष्ट आणि त्याच्या उक्ती व पुरावे इतके दिव्य आहेत की कोणा व्यक्तीस यात प्रविष्ट होण्यास बाध्य करण्याची आवश्यकता नाही. अल्लाहने ज्या व्यक्तीस आज्ञा केली असेल आणि ज्याचे हृदय सत्य स्वीकारण्यास उघडे केले असेल आणि ज्यास ज्ञानचक्षुची ज्योती प्रदान केली असेल तीच व्यक्ती स्पष्ट पुराव्यांमुळे स्वत: इस्लामचा स्वीकार करील आणि ज्याचे मन ईश्वराने अंध बनविले आणि ज्याची ऐकण्याची व पाहण्याची शक्तीला मोहोर लावण्यात आली असेल, त्याचे बळ व हिंसेद्वारे इस्लाममध्ये प्रवेश करणे त्यास लाभदायक ठरणार नाही.’’

जो कोणी सत्य प्रकट झाल्यानंतरदेखील त्याचा विरोधच करीत राहातो त्याच्याच मनावर मोहोर लावली जाते.

इमाम फखरुद्दीन राजी (रह.) देखील पवित्र कुरआनचे प्रसिद्ध टीकाकार होते. त्यांनी वरील आयतीच्या बाबतीत कुरआनचे आचार्य अबू मुस्लिम अस्फहानी आणि कफाल यांचे कथन उद्धृत केले आहे. त्याचा आशय असा,

‘‘ईश्वराने धर्मकार्य जोरजबरदस्तीवर अवलंबून ठेवलेले नसून अधिकार व हक्क यांच्यावर आधारित केले आहे. ईश्वराने एकेश्वरत्वाचे पुरावे, अशा प्रकारे समाधानकारक व योग्य प्रकारे सांगितले आहेत की बहाणा करण्याची व नाकारण्याची जागाच उरली नाही. तेव्हा त्याने फर्माविले की या तथ्यांच्या स्पष्टीकरणानंतर कोणा नाकारणाऱ्यास नकारावर दृढ राहाण्याचे कसलेच कारण उरले नाही. मग जर त्याने श्रद्धा ठेवली नाही तर त्यास विनवण्याचा फक्त एकच मार्ग उरतो आणि तो म्हणजे त्यास जबरदस्तीने श्रद्धा ठेवण्यास विवश केले जावे, परंतु हे उचित नाही. कारण हे विश्व पारख व परीक्षेचे ठिकाण आहे. बळजबरीने इस्लाम स्वीकारण्यास बाध्य करण्याने परीक्षा व पारखण्याचा उद्देश नष्ट होतो. त्याचाच पुरावा म्हणजे ईश्वराचे हे फर्मान होय.’’

त्यानंतर याच आशयाच्या पवित्र कुरआनच्या आणखीन अनेक आयतींचा पुरावा देण्यात आला आहे. शेवटी इमाम फखरुद्दीन राजी यांनीदेखील याच मतास

दुजोरा दिला आहे.

या विषयावर जितके लिहिले गेले आहे तेवढे पुरेसे आहे. तरीही कुरआनच्या आणखीन काही आयतींचा संदर्भ देण्यात येत आहे.

"पाहा तुमच्यासाठी तुमच्या पालनकर्त्याकडून डोळे उघडणारा प्रकाश आला आहे. आता जो डोळसपणे कार्य करील तो आपलेच भले करील आणि जो आंधळ्याप्रमाणे करील तो स्वतःचे नुकसान करून घेईल. मी तुमच्यावर काही पहारेकरी म्हणून नव्हे!" *(दिव्य कुरआन, ६:१०४)*

मौलाना आझाद यांनी या आयतीचा अर्थ अशा प्रकारे सांगितला आहे-

"(पाहा) तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्यासाठी ज्ञान व पुराव्याचा प्रकाश आला आहे. ज्याने समजून घेतले (त्याचा लाभ) स्वःत त्याच्याकरिता आहे आणि (एखाद्याने आपल्या डोळ्यांनी पाहिले नाही आणि) आंधळा बनला तर त्या हानीस तो स्वतःच जबाबदार असेल आणि (हे पैगंबर! तुम्ही सांगा) मी तुमच्यावर पहारेकरी नाही (की बळजबरीने तुमचे डोळे उघडू)."

पुढील आयतींमध्ये म्हटले आहे की-

"हे मुहम्मद (स.) सांगून टाका की, "लोकहो! तुमच्यापाशी तुमच्या पालनकर्त्याकडून सत्य आलेले आहे. आता जो सत्यमार्ग अनुसरिल त्याचे सद्वर्तन त्याच्यासाठीच हिताचे आहे आणि जो मार्गभ्रष्ट राहील त्याची मार्गभ्रष्टता त्याच्यासाठीच विनाशकारी आहे. आणि मी तुमच्यावर काही हवालदार नाही."

*(दिव्य कुरआन, १०:१०८)*

मौलाना अबुल कलाम आझाद यांनी या आयतीचे स्पष्टीकरण खालीलप्रमाणे केले आहे.

"या आयतीत करण्यात आलेली घोषणा आपणास पवित्र कुरआनमध्ये जागोजागी आढळून येईल. त्यात या पूर्वी होऊन गेलेल्या पैगंबरांच्या उपदेशांची नक्कल करण्यात आलेली आहे. त्यामध्ये प्रत्येक ठिकाणी धार्मिक निमंत्रण आणि पूर्णपणे समजणेउमजणे व समजूनउमजून अवलंब करण्याचीच गोष्ट आढळून येते. यात कोणत्याही प्रकारची जबरदस्ती नाही आणि कसल्याही प्रकारच्या भांडणतंटा नाही. तुमच्या भलाईकरिता एक गोष्ट सांगण्यात आली आहे- जर लक्षात आले, उमजले तरच मान्य करा अन्यथा अमान्य करा. तुमचा मार्ग तुमच्यासाठी, आमचा मार्ग आमच्यासाठी. जर मान्य कराल तर तुमचेच कल्याण कराल आणि अमान्य कराल तर तुमचेच नुकसान कराल. मग त्याने चांगुलपणाच्या मार्गाने जाऊन पुण्य कमवावे अथवा वाईटपणाच्या मार्गाने जाऊन पाप कमवावे. याबाबतीत (प्रत्येक मनुष्य आपल्या

निर्णयाचा अधिकारी असतो.) जर कोणी चांगुलपणाच्या मार्गाने जाईल तर कोणा दुसऱ्याला काहीही देणार नाही जेणेकरून त्याने आपल्या मागे लागावे. जर कोणी वाईटपणाच्या मार्गाने जाईल तर कोणा दुसऱ्याचे नुकसान करणार नाही जेणेकरून त्याने आपल्यावर नाराज व्हावे. आपापला मार्ग आहे आणि आपापली मिळकत.''

''जो कोणी सत्कर्म करील स्वत:साठीच चांगले करील, जो दुष्कर्म करील त्याचे अरिष्ट त्याच्यावरच येईल. आणि तुझा पालनकर्ता दासांसाठी अत्याचारी नाही.''

*(दिव्य कुरआन, ४१:४६)*

त्याचबरोबर यथार्थांकडे बोलविणाऱ्याची योग्यता काय आहे याचेही स्पष्टीकरण दिले आहे.

मी निमंत्रक व उपदेशक आहे, मी काही तुमचा वकील नाही. म्हणजे माझे काम इतकेच की सदोपदेशाची आठवण करून देणे. तुमच्यावर चोहोबाजूंनी नजर ठेवून तुमचा रखवालदार बनून राहाणे हे माझे काम नाही. दुसऱ्या ठिकाणी इस्लामच्या पैगंबरांना उद्देशून याच अर्थाने म्हटले आहे की -

''बळजबरीने व जबरदस्तीने विवश करण्यासाठी तू त्या लोकांना अत्याचाऱ्यांच्या सरदारासारखा चोहोबाजूंनी घेरणारा नाहीस.''

आणि म्हटले -

''तुला या लोकांवर फौजदार म्हणून बसविलेले नाही की या लोकांनी मान्य केले अथवा न केले तरी तू त्यांना सत्याच्या मार्गावर नेण्यास जबाबदार आहेस.''

अनेक ठिकाणी विविध पद्धतीने ही सत्यता स्पष्ट करण्यात आली आहे की, सत्यतेची हाक उंच करणारा, सत्य संदेश पोहोचविणारा, उपदेशाची गोष्ट समजविणारा श्रद्धा व पवित्र कर्मांच्या परिणामांचा संदेश देणारा आणि विद्रोह व कुकर्मांच्या परिणामांपासून खबरदार करणारा याव्यतिरिक्त पैगंबरांचे दुसरे कुठलेही स्थान नाही.

यापेक्षा जास्त स्वच्छ, खरा, शांतता व सलोख्याचा एखादा दुसरा मार्ग असू शकतो काय? जर जगाने यास आवाहनाच्या अधिकाराचा आत्मा समजला असता तर एखाद्या मनुष्याने फक्त विश्वास व कर्माच्या जोरावर संघर्ष करणे शक्य होते काय? परंतु समस्या अशी आहे की, मानवाच्या अत्याचार व अवज्ञेनेदेखील सद्यस्थितीचा स्वीकार केला नाही आणि हीच गोष्ट सर्व विवादांचे मूळ बनली आहे. कुरआनने यापूर्वीच्या पैगंबरांच्या शिकवणींचा ज्या प्रकारे वृत्तान्त सांगितला आहे त्याचे मनापासून पठण करा. आपणास असे आढळून येईल की विवादाचे मूळ हेच होते. ईश्वराच्या प्रेषितांनी वेळोवेळी असे जाहीर केले आहे की आम्ही उपदेश करणारे आहोत मानणे न मानणे तुमचे काम आहे. जर मानले नाही तर तुम्ही तुमच्या मार्गाने

जा आणि आम्हाला आमच्या मार्गाने जाऊ द्या. पाहा काय परिणाम होतो. परंतु नाकारणारे म्हणत होते की आम्ही तुमचा उपदेशही मान्य करणार नाही आणि तुम्हाला तुमच्या मार्गानेही जाऊ देणार नाही!

इस्लाम व त्याच्या नाकारणाऱ्यांमध्ये जो विवाद सुरू झाला तोदेखील अशाच प्रकारचा होता. कुरआन म्हणत होते की माझा प्रचार व उपदेशाचा मार्ग आहे. विरोधक म्हणत होते की आमचा जोरजबरदस्ती आणि हिंसेचा मार्ग आहे. कुरआन म्हणत होते की जर माझे म्हणणे समजत असाल तर मान्य करा, समजले नाही तर समजणाऱ्यांना त्यांच्या मार्गाने जाऊ द्या. ते म्हणतात की आमचे म्हणणे तुमच्या लक्षात येवो अथवा न येवो तुम्हाला ते मान्य करावेच लागेल, जर ते मानण्यास तुम्ही नकार दिला तर बळजबरीने मान्य करण्यास भाग पाडू.

वास्तवता अशी आहे की, कुरआनने या आणि तिच्या समानार्थी आयतीत सांगितलेली गोष्ट जर जगाने समजून घेतली असती तर कथनी व करणीच्या विसंगतीमुळे निर्माण झालेले (मानवजातीचे ते सर्व प्रकारचे रक्तपात) एकदम संपुष्टात आले असते. आजसुद्धा अशा प्रकारची जी भांडणे होत आहेत तीदेखील संपुष्टात आली असती. सर्व प्रकारच्या भांडणांचे मूळ कशात आहे, यावर विचारविनिमय व्हायला हवा. लोक समजण्यासवरण्यात आणि जोरजबरदस्तीत फरक करीत नाहीत. कुरआन म्हणतो की, या दोन्हींत फरक करा. यासाठीच आठवण देण्यात येत आहे की जी गोष्ट व्यवस्थित समजते तिचा इतरांना फक्त प्रोत्साहनात्मक उपदेश करा, त्यापुढे जाऊ नका. म्हणजे या गोष्टीचा विसर पडू नये की पसंत करणे वा नापसंत करण्याचा अधिकार दुसऱ्यांना आहे, त्यासाठी तुम्ही जबाबदार नाही. काठी घेऊन उभे राहाणे आणि जो कोणी तुमच्याशी सहमत असणार नाही त्याच्या पाठीमागे लागणे यासच जोरजबरदस्ती व जुलूम म्हणतात. जणू काय ईश्वराने तुम्हास लोकांच्या मार्गदर्शन व पदभ्रष्टतेचा ठेकेदार बनविले आहे. मात्र कुरआन स्पष्टपणे सांगत आहे की, अल्लाहकडून नियुक्त केलेले असूनसुद्धा (पैगंबरांचे पददेखील उपदेश देणे व प्रचारप्रसारापर्यंतच मर्यादित होते.) यावरून हेच स्पष्ट होते की मानवाने वकील, फौजदार आणि जोरजबरदस्ती करणारा बनावे हे अल्लाह कदापि सहन करू शकणार नाही.

मुळात मानवी कर्मांच्या क्षेत्रांत खरा प्रश्न मर्यादांचाच आहे आणि प्रत्येक ठिकाणी मानवाने तेथेच ठोकर खाल्ली आहे. म्हणजे प्रत्येक गोष्टीची जी सीमा आहे तो त्याच्या आत राहू इच्छित नाही. दोन हक्क आहेत. आणि दोघांनाही आपापल्या मर्यादेत राहिले पाहिजे. एक हक्क (उपदेश देणे) व प्रचार-प्रसार करण्याचा आहे तर दुसरा निवड व स्वीकृतीचा आहे. प्रत्येक मानवास याचा अधिकार आहे की जी गोष्ट तो योग्य

समजतो ती दुसऱ्यांनाही समजावून सांगावी, परंतु दुसऱ्याचा हक्क नाकारण्याचा त्यास अधिकार नाही. म्हणजे जशी एक गोष्ट मान्य करणे वा अमान्य करण्याचा त्याला अधिकार आहे, तसाच दुसऱ्यालादेखील मान्य अथवा अमान्य करण्याचा अधिकार आहे. एक व्यक्ती दुसऱ्याकरिता जबाबदार नाही.

आम्ही या ठिकाणी ज्या गोष्टीस अधिकार किंवा हक्क म्हटले आहे कुरआनने त्यास प्रत्येक मानवाचे कर्तव्य म्हटले आहे. म्हणजे त्याच्या मते जी गोष्ट तुम्ही सत्य मानता ती दुसऱ्यांपर्यंत पोहोचविणे तुमचे कर्तव्य आहे. यात जर गफलत कराल तर ईश्वरासमोर उत्तरदायी ठराल. परंतु हेदेखील लक्षात असू द्या की (उपदेश देणे) व प्रचारप्रसार करणे ही जोरजबरदस्ती नसून कर्तव्य आहे. दुसऱ्यांनी मान्य केले अथवा नाही याचे उत्तरदायित्व तुम्हावर नसून तुम्ही प्रचारप्रसार केला की नाही याचे उत्तरदायित्व तुम्हावर असेल.

पाहा, किती उच्चकोटीच्या न्यायानिशी या विषयाच्या दोन्ही पैलूंचे कुरआनने संरक्षण केले आहे! आणि मग त्याची सीमारेषा आखली आहे. त्याने एकीकडे उपदेश व आवाहनावर जोर दिला आहे कारण हक्काची मागणी व स्थापनेचा आत्मा कुंठित होऊ नये. दुसरीकडे (मानवाचे वैयक्तिक स्वातंत्र्यदेखील दृढ केले) जोरजबरदस्ती व हिंसेव्दारा अनुचित हस्तक्षेप करता येऊ नये म्हणून याच मर्यादेमुळे स्थिती कायम राहाते. ही मर्यादा कमीजास्त झाल्यास दोन्हीपैकी एक गोष्ट निश्चितपणे वाईट होईल. जर आवाहन व उपदेशाचे पाऊल पुढे पडले तर आस्था व विचाराचे वैयक्तिक स्वातंत्र्य बाकी उरणार नाही. जर वैयक्तिक स्वातंत्र्याची मागणी करू लागाल तर हक्क व न्यायालयाच्या तपास व स्थिरतेची व्यवस्था बिघडली जाईल. म्हणजे सत्य व न्यायाची मागणी व स्थापनेची व्यवस्था छिन्नविच्छिन्न होईल.

कुरआनच्या अनेक गोष्टींप्रमाणेच ही गोष्ट समजून घेण्यासदेखील जगाने फार विलंब केला. इतिहासाला बारा शतकांपर्यंत या गोष्टीची वाट पाहावी लागली की एका मानवाने दुसऱ्या मानवाचा केवळ विश्वासघाताच्या कारणावरून वध करू नये. उपदेश व ईश्वरावर भरवसा ठेवणे यात फरक आहे हे लक्षात घ्यावे. आता दिडशे वर्षांपासून ही गोष्ट जगातील बौद्धिक सत्यांपैकी एक समजली जाते. परंतु त्यास माहीत नाही की त्याच्या प्रकटनाचा इतिहास अमेरिका व फ्रांसच्या मानवाधिकाराच्या प्रकटनापासून सुरू झाला नसून तो १५०० वर्षांपूर्वी सुरू झाला होता.

*(तर्जुमानुल कुरआन, भाग-२, पृष्ठ १७२ ते १७४)*

या विषयाच्या इतक्या गंभीर व विस्तृत विवेचनेनंतर 'इस्लाममध्ये जबरदस्तीने मुस्लिम बनविण्याची परवानगी अस्तित्वात नाही' ही गोष्ट मान्य करण्याबाबत आता कोणत्याही प्रकारचा संदेह उरत नाही.

प्रकरण २

## इस्लामी युद्धाचा उद्देश

इस्लाममध्ये जबरदस्तीने मुस्लिम बनविण्याची अनुमती नाही ही गोष्ट आता पूर्णतः सिद्ध झाली आहे. तरीही एका युगापासून रूजलेल्या भ्रम व संदेहांमुळे काही लोकांच्या मनात असा प्रश्न उद्‌भवू शकतो की कुरआनमध्ये युद्धाबाबत जे आदेश आहेत, त्यांचा उद्देश काय आहे आणि पैगंबर मुहम्मद (स.) आणि त्यांच्या साथीदारांच्या कालखंडात ज्या लढाया झाल्या त्या का झाल्या?

इस्लाम जबरदस्तीने मुस्लिम बनविण्याची अनुमती देत नाही, ही गोष्ट सिद्ध झालेली असताना कुरआनमध्ये युद्धाचे आदेश आहेत आणि इस्लामचे पैगंबर व त्यांच्या साथीदारांच्या कालखंडात लढाया झाल्या. त्या लढाया लोकांना जबरदस्तीने मुस्लिम बनविण्यासाठीच झाल्या होत्या, असा (सुरूवातीलाच) भ्रम व शंका निर्माण करणे अनुचित ठरेल. (प्रत्येक विवेकशील व्यक्तीच्या मनात विचार येऊ शकतो.) इस्लामी लढायांचा उद्देश निश्चितच वेगळा असावा याबाबत आणि हे तथ्यदेखील आहे.

या विषयाशी संबंधित दोन प्रमुख विद्वानांचे निष्कर्ष पुढे देत आहोत.

प्रसिद्ध इंग्रज महिला मिसेस ॲनी बेझंट यांचे भारतीय इतिहासात एक विशिष्ट स्थान आहे. आपल्या एका व्याख्यानात त्या म्हणतात,

''पैगंबर मुहम्मद (स.) देशत्याग करून मदीनेला येतात आणि तेथील लोक त्यांच्याशी अतिशय प्रेमाने वागतात आणि तेथे त्यांना शासक बनविले जाते. त्यांचे शत्रू मक्केपासून त्यांचा पाठलाग करतात. पैगंबरांच्या साथीदारांची संख्या फारच कमी आहे आणि शत्रूची सेना खूप मोठी आहे. शेवटी दोघांच्या दरम्यान लढाई होते आणि हे युद्ध 'बदरची लढाई' या नावाने प्रसिद्ध आहे. पैगंबर ओरडून म्हणतात, 'हे ईश्वरा! जर आज ही छोटीशी टोळी नष्ट झाली तर पुन्हा (जगात) तुझी खरी उपासना करणारा कोणीही मागे राहणार नाही!'' घमासान युद्ध सुरू असते. पैगंबरांना विजय प्राप्त होतो, कारण ईश्वशक्ती पैगंबरांबरोबर आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी स्वरक्षणाच्या उद्देशाने लढलेले हे पहिले युद्ध होते. पैगंबर (स.) सहृदय व दयाळू होते. त्यांचे शत्रू त्यांना 'स्त्रीहृदय बाळगणारा' म्हणून बोलावत असत. परंतु त्यांच्याविरुद्ध करण्यात आलेल्या सर्व अपराधांना माफ करण्याइतपत ते आता सर्वसामान्य व्यक्ती राहिले नव्हते. ते एका राज्याचे शासक आहेत, एका सेनेचे सेनापती आहेत आणि त्यांच्यावर त्या साथीदारांचेसुद्धा काही अधिकार आहेत, ज्यांनी त्यांच्यावर विश्वास टाकला आहे. सामान्य व्यक्तीच्या स्वरुपात त्यांनी अपराध माफ करण्याचे दिवस लवकरच येणार आहेत. परंतु एक शासक म्हणून त्यांनी सजा (शिक्षा) देणे अनिवार्य

ठरते. पैगंबर मुहम्मद (स.) भावनेच्या भरात एखादे काम करणाऱ्यापैकी नव्हते. बदरच्या विजयानंतर फक्त दोनच मनुष्यांना मृत्युदंड देण्यात आला आणि अरबांच्या प्रथेविरुद्ध पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आज्ञेनुसार कैद्यांना सौहार्दपूर्वक वागणूक देण्यात आली. मुस्लिम त्यांना भाकरी जेवू घालत व स्वत:करिता फक्त खजूर ठेवत असत.''

*(मासिक निजामुल मशाइख, दिल्ली, जमादिलउला १९३४)*

प्रसिद्ध इतिहासकर मिस्टर एडवर्ड गिब्ज् लिहितात-

''नैसर्गिक नियमानुसार शस्त्राद्वारे आपले प्राण व धनाचे रक्षण करणे, आपल्या शत्रूच्या दमन व अत्याचाराचा बलपूर्वक प्रतिकार करणे वा रोखणे आणि त्यांच्या बरोबरच्या शत्रुत्वास बदल्याच्या योग्य मर्यादेपर्यंत प्रसारित करणे, हा प्रत्येक माणसाचा अधिकार आहे. अरबांच्या स्वतंत्र समाजात काही प्रथा आणि नगरातील नागरिकांच्या पारंपरिक वर्तणुकीमुळे लोकांच्या कर्तव्यात एक दुबळा अडथळा होता. पैगंबर मुहम्मद (स.) यांना आपल्या देशवासियांच्या अन्यायामुळे निरंतर शांतीपूर्ण व जनतेच्या भलेपणावर अवलंबून असलेला आपला संदेश पोहोचविण्यापासून वंचित ठेवण्यात आले आणि स्वदेशातून निघून जाण्यास भाग पाडले. एका स्वाधीन जातीच्या स्वीकृतीने मक्केच्या या शरणार्थ्यास शासकाच्या पदावर बसविले आणि त्यास योग्य प्रकारे लोकांशी मैत्री करणे आणि शत्रुंच्या आक्रमनांना लोटून लावणे वा त्यांच्यावर आक्रमण करण्याचा अधिकार मिळाला.''

''विश्वाचे खरे कल्याण हा (शुद्ध वास्तविक उद्देश) पैगंबर मुहम्मद (स.) यांचा होता. असा शुभचिंतक बुद्धीस विश्वास वाटू शकतो. आपल्या दाव्यांना नाकारणाऱ्या व आपल्या तर्कांचा अपमान करणाऱ्या आणि आपल्या जीवास यातना देणाऱ्या हट्टी विरोधकांना, एक असा पैगंबर जो स्वत: मनुष्य होता, सहन करेल, असे कदापि होऊ शकत नाही. तो आपल्या वैयक्तीक शत्रुंना क्षमा करू शकेल, मात्र ईश्वराच्या शत्रुंशी योग्य प्रकारे शत्रुत्व बाळगू शकतो.'' *(एजाजुन्तन्जील, पृष्ठ ४५०)*

प्रसिद्ध इंग्रज इतिहासकार मिस्टर थॉमस कार्लायल लिहितात -

''पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आतापर्यंत आपल्या धर्माच्या प्रचाराकरिता फक्त धार्मिक उपदेश व प्रवचन देण्याची पद्धत अवलंबिली होती. परंतु आता अन्यायपूर्वक रितीने त्यांना देशाबाहेर काढण्यात आले आणि अत्याचारी लोकांनी त्यांच्या खरा अलौकिक संदेश ऐकण्यास अनिच्छा व्यक्त केली. तो संदेश त्यांच्या हृदयाचा आवाज होता. इतकेच नव्हे तर जेव्हा ते हा संदेश ऐकविण्याचे थांबवत नसत तेव्हा त्यांच्या प्राणावर उठले. अशा परिस्थितीत त्यांनी एका वीर अरबाप्रमाणे

आपल्या संरक्षणाचा निश्चय केला. पैगंबर मुहम्मद (स.) यांना दहा वर्षे युद्ध, कठीण श्रम आणि संघर्षात व्यतीत करणे भाग पडले आणि त्याचा जो काही परिणाम झाला तो आम्हा सर्वांना ठाऊक आहे.''

खरी गोष्ट अशी आहे की इस्लाम केवळ ईशोपासना आणि काही रीती-रिवाजांपर्यंत मर्यादित नाही. इस्लाम एक संपूर्ण जीवनव्यवस्था आहे. यास आपण हवे तर ईश्वरवाद म्हणू शकता म्हणजे ईश्वआदेशांवर व नियमांवर आधारित. एखादी जीवनव्यवस्था अशी असू शकत नाही, ज्यात युद्ध आवश्यक आणि अनिवार्य नसेल. अशी कोणतीही व्यवस्था बाह्य शत्रुंपासून सुरक्षित असू शकत नाही आणि अंतर्गत दुष्टांपासून व द्रोह्यांपासून एरव्ही ती सुरक्षित असू शकत नाही. (ती आपला उद्देश व सिद्धान्तास सफल करू शकणार नाही.) जर त्या व्यवस्थेबरोबर युद्धशक्ती व युद्धप्रबंध नसेल. जी जीवनव्यवस्था आपण स्वत: मान्य करता तिच्याच बाबतीत विचार करा, ती युद्धशक्तीविना आपल्या उद्देश व सिद्धान्तास सफल (यशस्वी) करू शकेल काय? आणि सफल होऊन स्थिर व कायम राहू शकेल काय? नाही, कदापि नाही, हे अशक्य आहे!

इस्लामला आपल्या सुरूवातीच्या काळात मोठमोठी दु:खे व संकटांना तोंड द्यावे लागले. अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) आणि त्यांचे मूठभर साथीदार आपल्या विश्वास, सिद्धान्त आणि उद्देशांचे पालन करीत होते. आणि ते इतरांपर्यंत हा संदेश पोहोचविण्याव्यतिरिक्त दुसरे काहीही करत नसत. परंतु एवढ्यावरच संपूर्ण शहर, संपूर्ण देश व संपूर्ण जग त्यांचा शत्रू बनला. महिना - दोन महिने नव्हे, वर्ष - दोन वर्ष नव्हे तर तब्बल बारा वर्षे मुस्लिमांवर निरंतर अत्याचार होत राहिले. मुस्लिमांना ठेचून काढले जावे आणि इस्लामला नष्ट करण्यात यावे, असा निश्चय करण्यात आला होता. इतकेच नव्हे तर इस्लामचे पैगंबर मुहम्मद (स.) आणि मुस्लिम आपली जन्मभूमी व आपले सर्व काही सोडून मक्केहून मदीनेला निघून गेले. एवढे झाले तरी इस्लाम व मुस्लिमांविरुद्ध शत्रुत्व व अत्याचाराचा क्रम चालूच राहिला. जे मुस्लिम आपल्या लाचारीमुळे मक्केतच राहिले होते त्यांना आणखीन जास्तच त्रास दिला जाऊ लागला. आणि जे मुस्लिम मदीनेला निघून गेले होते त्यांच्यावरसुद्धा आक्रमणे होऊ लागली. तेव्हा कुठे मुस्लिमांना स्वसंरक्षणासाठी युद्ध करण्याची अनुमती मिळाली.

युद्धाच्या अनुमतीची पहिली आयत अशी आहे,

''परवानगी दिली गेली त्या लोकांना ज्यांच्याविरुद्ध युद्ध सुरू आहे. कारण ते अत्याचारपीडित आहेत. आणि अल्लाह निश्चितपणे त्यांच्या मदतीला समर्थ आहे. हे ते लोक आहेत जे आपल्या घरांतून नाहक बाहेर काढले गेले, केवळ या अपराधापायी की ते म्हणत होते, ''आमचा पालनकर्ता अल्लाह आहे.'' जर अल्लाह

लोकांना एक दुसऱ्याकरवी हटवीत नसता तर, मठ आणि चर्च व 'सिनेगॉग' आणि मस्जिदी ज्यांत अल्लाहचे नाव मोठ्या प्रमाणात घेतले जाते. सर्व उद्‌ध्वस्त केली गेली असती. अल्लाह जरूर त्या लोकांना साहाय्य करील जे त्याला साहाय्य करतील. अल्लाह मोठा शक्तिशाली आणि जबरदस्त आहे.'' *(दिव्य कुरआन, २२:३९-४०)*

याचा अर्थ मौलाना आझाद यांनी अशा प्रकारे सांगितला आहे,

''ज्यांच्या (आज्ञाधारकांच्या) विरुद्ध युद्ध पुकारले आहे आता त्यांनादेखील (याच्या उत्तरादाखल) युद्धाची अनुमती दिली जाते, कारण त्यांच्यावर एकसारखा अत्याचार होत आहे. आणि अल्लाह त्यांची मदत करण्यास समर्थ आहे. ज्यांना कसल्याही प्रकारचा अधिकार नव्हता अशा अत्याचारपीडितांना त्यांच्या घरातून बाहेर काढण्यात आले, त्यांचा काहीही अपराध नव्हता. त्यांचा अपराध इतकाच की, ते म्हणत असत आमचा पालनकर्ता अल्लाह आहे. आणि पाहा, अल्लाह काही लोकांकरवी काही लोकांचे रक्षण करवीत नसता (आणि एका गटास दुसऱ्या गटावर अत्याचार व आक्रमण करण्याकरिता मोकाट सोडले असते) तर कोणत्याही लोकसमूहाचे उपासनागृह जमिनीवर सुरक्षित राहिले नसते. मठ, गिरजाघर, उपासनागृह, मस्जिदी ज्यांत मोठ्या प्रमाणात अल्लाहचे नाव घेतले जाते, सर्व कधीच उद्‌ध्वस्त केले गेले असते. (लक्षांत असू द्या) जो अल्लाह (च्या सत्यते) चे समर्थन करील, निश्चित अल्लाहसुद्धा त्याची मदत करील. खरोखरच तो बलवान व सर्वांपेक्षा प्रभुत्वसंपन्न आहे यात काडीमात्र शंका नाही.''

''हे ते लोक आहेत ज्यांना आम्ही जर पृथ्वीवर सत्ता बहाल केली तर ते नमाज कायम करतील, जकात देतील, सत्कर्माचा आदेश देतील आणि वाईटाला प्रतिबंध करतील. आणि सर्व बाबींचा अंतिम परिणाम अल्लाहच्या अखत्यारीत आहे.'' *(दिव्य कुरआन, २२ : ४१)*

मौलाना आझाद यांनी या आयतींचा अर्थ अशा प्रकारे सांगितला आहे,

''मुस्लिमांना आपल्या संरक्षणाकरिता शस्त्र हाती घेण्याची अनुमती देण्यात आली आहे. युद्धाच्या अनुमतीच्या बाबतीत अवतरित झालेली ही पहिली आयत आहे, यावर सर्व धर्मपंडितांचे एकमत आहे.''

यापूर्वी मक्केतील कुरेशांचा (मक्केतील प्रसिद्ध जातीचा) असा अत्याचार सांगण्यात आला होता की त्यांनी मुस्लिमांकरिता हजयात्रेचा मार्ग बंद केला आहे. याचा त्यांना (कुरेशांना) कसलाही अधिकार नाही युद्धाच्या अनुमतीचे काय कारण आहे हे स्पष्ट शब्दांत असे सांगण्यात आले आहे,

''मुस्लिम अत्याचारपीडित आहे आणि अत्याचाऱ्याचा सामना करून आपला

बचाव करणे हा अत्याचारपीडिताचा अधिकार आहे. हे अत्याचारपीडित तेरा वर्षांपर्यंत मक्केच्या कुरैशांच्या अत्याचार व हिंसेचे लक्ष्य बनत राहिले. शेवटी विवश होऊन स्वदेशत्याग करावा लागला. परंतु विदेशातदेखील त्यांना सुखात राहू दिले गेले नाही. त्यांच्याविरुद्ध युद्ध पुकारले गेले, त्यांचा असा काय गुन्हा होता? फक्त हाच की ते म्हणत असत ''रब्बुनल्लाह'' (आमचा पालनकर्ता अल्लाह आहे) आम्ही आमच्या खात्रीनुसार आपल्या पालनकर्त्याचे स्मरण करू इच्छितो, आमच्या धर्माचा स्वीकार करण्याकरिता आम्ही इतरांना विवश करत नाही, परंतु आम्ही आमच्या आस्था व विश्वासापासून वेगळे व्हावे म्हणून दूसरे लोक आम्हाला का विवश करतात?''

यानंतर स्पष्ट करण्यात आले की, ''हा अत्याचारपीडितांचा नैसर्गिक हक्क आहे, जर त्यांना या हक्कापासून वंचित करण्यात आले. तर जगात अत्याचारी मानवांच्या अन्याय अत्याचाराचा प्रतिकार करण्याचा प्रश्नच बाकी राहात नाही. बलाढ्य टोळी (लोकसमूह) दुर्बल टोळीच्या विश्वास व कर्माचे स्वातंत्र्य कायमचे नष्ट करील. मग फर्माविले गेले,

''येथे अल्लाहने एका समूहाद्वारे दुसऱ्या समुहाच्या अत्याचार व हिंसेला नष्ट करण्याची व्यवस्था करून ठेवली आहे. जर एकाद्वारे दुसऱ्याचे रक्षण करण्याचा क्रम अस्तित्वात नसता तर जगात ईश्वरनिष्ठेचा अंत झाला असता. कोणत्याही जनसमूहाचे उपासनास्थान मानवी अन्याये - अत्याचारापासून सुरक्षित राहिले नसते.''

कुरआननुसार मुस्लिमांचा अधिकार व सत्तेचा खरा उद्देश काय होता? फर्माविले, ''या अत्याचारपीडित मुस्लिमांचे पाय स्थिर झाल्यावर त्यांनी काय करावे? म्हणजे पृथ्वीवर सत्ताप्राप्तीच्या कोणत्या उद्देशपूर्तीसाठी सत्ता उपयोगात आणावी? याचकरिता की, नमाज कायम करावी, जकात अदा करावी, पुण्यकर्माचा आदेश द्यावा, कुकर्म करण्यापासून रोखावे आणि अत्याचार व वाईट कर्माऐवजी न्याय, सत्कर्म व पुण्याईचे राज्य स्थापित व्हावे.'' *(तर्जुमानुल कुरआन, भाग २, पृष्ठ ५११-५१२)*

याच प्रकारची आणखी एक आयत आहे ज्याद्वारे इस्लामी युद्धाचा उद्देश प्रकट होतो, फर्माविण्यात आले आहे,

''मग काय कारण आहे की तुम्ही अल्लाहच्या मार्गात त्या असहाय पुरुष, स्त्रिया आणि मुलांकरिता लढू नये. ज्यांचे दुर्बल असल्यामुळे दमन केले गेले आहे आणि धावा करीत आहेत की, हे पालनकर्त्या! आम्हाला या वस्तीतून बाहेर काढ ज्याचे रहिवाशी अत्याचारी आहेत आणि तुझ्याकडूनच आमचा एखादा वाली व साहाय्यक निर्माण कर.'' *(दिव्य कुरआन, ४ :७५)*

मौलाना आझाद यांनी या आयतीचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे केले आहे-

"येथे हे सत्यदेखील स्पष्ट करण्यात आले की कुरआनने युद्धाचा आदेश मुस्लिमांनी दुसऱ्यांवर बळजबरी करण्यासाठी दिलेला नसून अत्यांचारपीडित असहाय लोकांचे साहाय्य करण्यासाठी आणि त्यांना अत्याचाऱ्यांच्या पकडीतून मुक्त करण्यासाठी दिला आहे. म्हणूनच तो पुन्हा पुन्हा म्हणतो की, अल्लाहच्या मार्गात लढा, म्हणजे आपल्या मनोकामनांसाठी नव्हे तर अल्लाहच्या न्यायनिवाड्याच्या स्थापनेसाठी लढा."

*(तर्जुमानुल कुरआन, भाग-१, पृ. ३७९)*

काही प्रमुख आयतींचा संदर्भ घेऊन इस्लामविरुद्ध प्रचार करण्यात आला आहे. विशेषत: स्वामी दयानंद यांचे पुस्तक 'सत्यार्थ प्रकाश'मध्ये इस्लामबद्दल मोठा भ्रम पसरविण्यात आला आहे. त्यात म्हटले आहे की, कुरआनने मुस्लिमांना आदेश दिला आहे की एकेश्वरत्व न मानणाऱ्यांना (काफिरांना) दिसतील तेथे ठार करा. या दुष्प्रचाराची सत्यता काय आहे? हे स्पष्ट होणे गरजेचे आहे. पवित्र कुरआनमध्ये आहे -

"आणि तुम्ही अल्लाहच्या मार्गात त्या लोकांशी लढा जे तुमच्याशी लढतात परंतु अतिरेक करू नका. अल्लाहला अतिरेक करणारे आवडत नाहीत, आणि त्यांच्याशी युद्ध करा जिथे कुठे तुमचा त्यांच्याशी सामना होईल आणि त्यांना त्या ठिकाणाहून हाकलून लावा जिथून तुम्हाला त्यांनी हाकलले होते. हे यासाठीच की जरी हत्या करणे वाईट असले तरी उपद्रव करणे हे त्यापेक्षाही वाईट आहे. पवित्र मस्जिदीच्या (काबागृहाच्या) निकट जोपर्यंत ते तुमच्यासी युद्ध करणार नाहीत तोपर्यंत तुम्हीही त्यांच्याशी युद्ध करू नका. परंतु जेव्हा ते युद्ध करतील तेव्हा तुम्हीही त्यांच्यासी युद्ध करा. द्रोह करणाऱ्यांसाठी हीच शिक्षा आहे. नंतर जर ते (युद्धापासून) परावृत्त झाले तर अल्लाह क्षमावंत व कृपावंत आहे. त्यांच्याशी तोपर्यंत युद्ध करा जोपर्यंत उपद्रव नष्ट होत नाही आणि अल्लाहसाठीच जीवनव्यवस्था (प्रस्थापित) होईल. मात्र जर ते परावृत्त झाले तर लक्षात ठेवा की, अत्याचाऱ्यांशिवाय कुणाशीही शत्रुत्व उचित नाही."

*(दिव्य कुरआन, २:१९०-१९३)*

या सर्व आयती युद्धासंबंदी होत्या यावर सर्व मुस्लिमेतर बांधवांनी लक्षपूर्वक विचार करावा.

मुस्लिमांना विधर्मांशी ते केवळ विधर्मी आहेत म्हणून युद्ध करण्याची परवानगी देण्यात आलेली नसून जे इस्लामला सहन करू शकत नाहीत, जे मुस्लिमांचे शत्रू होते आणि मुस्लिमांना नष्ट करू इच्छित होते अशाच विधर्म्यांशी युद्ध करण्याची परवानगी देण्यात आली आहे.

मक्केचे विधर्मी पैगंबर मुहम्मद (स.) यांना सत्यधर्मा (इस्लाम) चा प्रचार करू

देत नव्हते. त्यांचा अपमान करत होते. काबामध्ये प्रार्थना (नमाज अदा) करू देत नव्हते. खोटा प्रचार करून त्यांच्या विरुद्ध लोकांना भडकवित व बहकवित होते जे त्यांच्यावर व मुस्लिमांवर भयंकर अत्याचार करत होते, ज्यांनी त्यांचा व त्यांच्या परिवाराचा बहिष्कार केला होता, तो तीन वर्षांपर्यंत चालू होता. हा बहिष्कार इतका निर्दयीपणे होता की बहिष्कृत कुटुंबाला मूठभर खाद्यसामुग्रीदेखील पोहोचू शकत नव्हती. मुलांची उपासमार होत होती. ती रडून रडून व्याकूळ होत होती. जीव वाचविण्यासाठी झाडांची पाने व वाळलेली कातडी भिजवून खाणे भाग पडत होते. किती हृदयहीन होते विरोधक! उद्देश हा की पैगंबर (स.) सत्यधर्माचा प्रचार बंद करण्यास विवश व्हावेत, अशा प्रकारे शत्रू एक-दोन वर्षे नव्हे तर तब्बल १३ वर्षे विरोध व अत्याचार करीत राहिले. सरते शेवटी त्यांनी पैगंबर (स.) यांची हत्या करण्याची योजना आखली. रात्रीच्या वेळी त्यांचे घर चोहोबाजूंनी घेरण्यात आले जेणेकरून ते बाहेर पडताच त्यांची हत्या करता यावी.

पैगंबर मुहम्मद (स.) ईशदूत होते, ईश्वर त्यांचा रक्षक होता. ते शत्रूंच्या मधून निघाले आणि मदीनेला पोहोचले. तेथील रहिवाशी मुस्लिम बनले होते आणि त्यांच्या सरदारांबरोबर असे निश्चित करण्यात आले होते की पैगंबर (स.) यांनी मक्का शहराचा त्याग करून मदीनेला निघून यावे.

एवढ्यावरच अत्याचाऱ्यांचे समाधान झाले नाही. त्यांनी मदीनेवर आक्रमण केले. या आयतींमध्ये अशा प्रकारच्या विधर्मी क्रूर शत्रुंशी युद्ध करण्याची आज्ञा देण्यात आली आहे. ही आज्ञा अनुचित आहे काय?

अशा शत्रुंशीदेखील युद्धाची आज्ञा देताना मुस्लिमांना अशी चेतावणी देण्यात आली आहे की तुम्ही युद्धाच्या स्थितीतही अत्याचार करू नये, अर्थात- तुमचे कोणतेही कृत्य अत्याचारपूर्ण असू नये. ईश्वर अत्याचार करणाऱ्यांना पसंत करीत नाही, हे लक्षात असू द्या.

या अत्याचाराचे तात्पर्यदेखील समजून घ्यायला हवे. अत्याचारामध्ये अनुचित, अनैतिकव अन्याय अशा प्रकारच्या सर्व कार्य व व्यवहारांचा अंतर्भाव होतो. मुस्लिमांना असा आदेश देण्यात आला आहे की, त्या लोकांशी युद्ध करणे निषिद्ध आहे जे तुमच्या धर्मात विघ्न-बाधा निर्माण करीत नाहीत. स्त्रिया, मुले, वृद्ध व जखमींवर हात न उचलणे, शेती व पशुंना निरर्थक हानी न पोहोचविणे, आपल्या शारीरिक शक्तीचा योग्य ठिकाणी वापर करणे आणि आवश्यक त्याच मर्यादेपर्यंत करणे, त्यापेक्षा जास्त नको. या आदेशाचा उद्देश असा होता की, इस्लामपूर्व काळात अरबवाशी हे सर्व अमानुष क्रूर कार्य करीत होते.

जर शत्रूच्या मनात शांतीचा विचार नसेल आणि तो युद्धच करू इच्छित असेल

तर अशा स्थितीत लढण्याव्यतिरिक्त दुसरा मार्गच उरत नाही. म्हणून म्हटले आहे की, जेथे कुठे त्यांच्यांशी सामना होईल, तेथे लढा आणि त्यांना त्या ठिकाणाहून हाकलून लावा जेथून तुम्हाला हाकण्यात आले होते.

रक्तापात हे काही प्रिय कार्य नाही. परंतु जेव्हा शत्रू धर्मात बाधा निर्माण करतो; विद्या, ज्ञान, उक्ती आणि पुराव्याद्वारे आपले विचार खरे सिद्ध करण्याऐवजी सक्तीने लोकांना सत्यमार्गापासून रोखतो; त्यांच्यावर आपले विचार आणि आपला विश्वास अन् अधिकार लादू इच्छितो; तर ते कृत्य हत्येपेक्षाही जास्त क्रूर काम आहे. अशा अत्याचारी शत्रूशी युद्ध करणेच कल्याणकारी आहे.

काबाच्या परिसरात युद्ध करणे निषिद्ध आहे, परंतु मक्केचे विधर्मी आपल्या शक्तीच्या घमेंडीत काबाच्या मर्यादेचादेखील विचार करीत नव्हते. म्हणून मुस्लिमांना सांगण्यात आले की, तुम्ही स्वत:हून काबाच्या परिसरात युद्ध सुरू करू नका. परंतु शत्रू मानायलाच तयार नसेल आणि युद्ध सुरू केले तर तुम्हीही त्यांच्याशी लढा.

अशा विधर्मी अत्याचारी व दुष्ट शत्रुंच्या बाबतीतदेखील मुस्लिमांना सांगण्यात आले आहे की, जर त्यांनी युद्धाचा परित्याग केला तर ईश्वर मोठा क्षमावान व दयावान आहे. अशा पवित्र शैलीत मुस्लिमांना नैतिकतेच्या उच्चकोटीची गोष्ट सांगितली गेली आहे. तात्पर्य असे की क्षमाशीलता व दयाळूपणा ईश्वराचा महान गुण आहे. म्हणून मुस्लिमांमध्येदेखील हा गुण असायला हवा. जर शत्रूने युद्धाचा परित्याग केला तर प्रतिकाराच्या भावनेने तुमचे लढणे उचित नाही. धर्ममार्गातीला अडथळा दूर करणे हाच तुमचा खरा उद्देश आहे. जर शत्रू धर्मांच्या मार्गातून बाजूला झाल्यास तुम्हीही आपला हात रोखावा.

शेवटी म्हटले गेले आहे की, धर्मांच्या मार्गातून अडथळा दूर करण्यासाठी तुमची लढाई आहे. जोपर्यंत अडथळा दूर होत नाही तोपर्यंत तुम्ही लढले पाहिजे. जेव्हा अडथळा दूर होईल आणि धर्म ईश्वराकरिता होईल अर्थात त्याची भक्ती, उपासना व आज्ञेच्या पालनात बाधा येता कामा नये. शत्रूने युद्ध थांबविले तर तुम्हीही लढू नका. लढाईचे प्रयोजन फक्त अत्याचाऱ्यांकरिताच करण्यात आले आहे.

युद्धाबाबतचा असा नियम कोणत्या धर्मात, कोणत्या व्यवस्थेत अथवा कोणत्या सामारिक शास्त्रात (युद्धविषयक शास्त्रात) आहे? विरोधकांनी अशा पवित्र शिकवणीस भ्रष्ट प्रचार करून कसे विकृत बनविले आहे? याचा मुस्लिमेतर बंधुंनी विचार करावा.

याच आशयाची एक आयत आणखी एका ठिकाणीदेखील आहे. स्वामी दयानंदजींनी या आयतीवरसुद्धा आक्षेप घेतला आहे. ती आयत अशी,

''हे श्रद्धावंतांनो! या अश्रद्धावंतांशी युद्ध करा इथपर्यंत की हिंसाचार शिल्लक

राहू नये आणि धर्म सर्वस्वी अल्लाहसाठी होईल. मग जर ते हिंसाचारापासून परावृत्त झाले तर त्यांची कृत्ये पाहणारा अल्लाह आहे. पण जर का त्यांनी मानले नाही तर समजून असा की अल्लाह तुमचा वाली आहे, आणि तो सर्वोत्तम सहायक व मदतगार आहे.''

*(दिव्य कुरआन, ८:३९-४०)*

या आयतींचादेखील तोच उद्देश आहे जो 'सूरह बकरा'च्या उपरोक्त आयतींचा होता. मुस्लिमांना सत्यधर्माचे रक्षण आणि सन्मार्गातील बाधा दूर करण्याव्यतिरिक्त कोणत्याही भौतिक उद्देशाकरिता युद्ध करण्याची अनुमती नाही. आम्ही अंततः मुस्लिमेतरांच्या बाबतीत पवित्र कुरआनच्या दोन आयती येथे सादर करीत आहोत. या आयतींवरून मुस्लिमेतरांच्या बाबतीत इस्लामचा सिद्धान्त काय आहे हे त्यांना स्पष्टपणे लक्षात येईल.

''अल्लाह तुम्हाला या गोष्टींची मनाई करीत नाही की तुम्ही त्या लोकांशी सद्व्यवहार आणि न्यायाचे वर्तन करावे, ज्यांनी धर्मांच्या बाबतीत तुमच्याशी युद्ध केले नाही आणि तुम्हाला तुमच्या घरातून बाहेर काढले नाही. अल्लाह न्याय करणाऱ्यांना पसंत करतो. तो तुम्हाला ज्या गोष्टीची मनाई करतो ती तर ही आहे की, तुम्ही त्या लोकांशी मैत्री करावी ज्यांनी तुमच्याशी धर्मांच्या बाबतीत युद्ध केले आहे आणि तुम्हाला तुमच्या घरातून बाहेर काढले आहे, आणि तुम्हाला बाहेर घालविण्यात एक दुसऱ्यास मदत केली आहे. त्यांच्याशी जे लोक मैत्री करतील तेच अत्याचारी आहेत.''

*(दिव्य कुरआन, ६०:८-९)*

इस्लामी युद्ध अथवा 'जिहाद'च्या बाबतीत इस्लाम व कुरआनबद्दल आमच्या देशात जो द्वेषपूर्ण व भ्रामक प्रचार करण्यात आला आहे तो किती आधारहीन व भ्रष्ट आहे, ते आम्ही पवित्र कुरआनद्वारा सिद्ध केले आहे. आशा आहे की आता मुस्लिमेतर बंधुंना जुना किंवा नवीन कोणताही दुष्प्रचार प्रभावित करणार नाही. या विषयाच्या बाबतीत शेवटी जर आम्ही या ठिकाणी दोन घटनांची चर्चा केली तर ते अनुचित ठरणार नाही.

रामनगरमध्ये आमचे एक सनातन धर्मीय मित्र आहेत. इंग्रजीचे बी.ए. संस्कृतचे उच्चकोटीचे विद्वान, अनेक पुस्तकांचे लेखक आणि पुराणांचे अनुवादक आणि विचाराने राष्ट्रीय स्वयंसेवक संघी! एक वेळ त्यांनी लखनौ येथून प्रकाशित होणारे मासिक 'राष्ट्र-धर्म'मधील इस्लामविरोधी एक लेख मला वाचून दाखविला. त्यात पवित्र कुरआनची ही आयत होती -

''मुस्लिमांच्या विरुद्ध विधर्मीयांना आपला संरक्षक-मित्र मुस्लिमांनी बनवू नये.''

या आयतीमुळे आमच्या मित्राच्या भावना दुखावल्या गेल्या होत्या. याचा

अनुवाद ऐकवून त्यांनी विचारले - ''अनुवाद ठीक आहे का ?'' मी म्हटले ''अनुवाद ठीक आहे, परंतु याचा तो उद्देश नाही जो लेखकाने सांगितला आहे. या आयतीचा संबंध मक्कावासियांशी आहे जे मदीनेवर आक्रमण करीत होते आणि युद्धाची स्थिती निर्माण झाली होती. जे मुस्लिम मक्का सोडून मदीनेला आले होते, त्यांच्यापैकी काहींचे नातेवाईक मक्केत राहिले होते. मदीनेतील अशा मुस्लिमांसंबंधी ही आयत आहे.'' मग मी माझ्या मित्राला मौलाना अबुल कलाम यांच्या 'तर्जुमानुल कुरआन'मधून या आयतीचे तात्पर्य वाचून ऐकविले ते असे,

''जसे की आता निर्णयाची वेळ आली आहे म्हणून इस्लामच्या अनुयायींना संबोधित करून म्हटले गेले आहे की, त्यांनी कार्यरत व्हावे आणि दुर्बलता दाखवू नये. या संदर्भात सर्वात महत्त्वाची गोष्टी अशी की, आपल्या वैयक्तिक संबंधांना सामूहिक संबंधांवर वर्चस्व देऊ नये. आणि शत्रूंना आपला साहाय्यक व मित्र बनवू नये.

''युद्ध-क्षेत्र तापले आहे. मित्र व शत्रूच्या दोन रांगा वेगवेगळ्या उभ्या राहिल्या आहेत. तेव्हा त्यापैकी कोणतीही एक रांग निवडणे प्रत्येक व्यक्तीस आवश्यक झाले आहे. ज्या रांगेची निवड केली जाईल त्या रांगेत जायला हवे. एका रांगेत सामावून दुसऱ्या रांगेशी संबंध प्रस्थापित करणे, असे घडता कामा नये.'' *(भाग १, पृ.३१८)*

हे स्पष्टीकरण ऐकवून मी सूरह बकराची त्या आयती दाखविल्या ज्यांना आम्ही वर सादर केल्या आहेत. म्हटले - ''या आयती पाहा ज्यांत भयंकर युद्धाची शिकवण दिली गेली आहे आणि आयतींच्या प्रत्येक वाक्याचा आशय समजावून सांगितला. तेव्हा माझे मित्र जे स्वयंसेवक संघाचे सदस्य असून धार्मिक भावनेचे व्यक्ती आहेत, या आयतींचे तात्पर्य अवगत झाल्यानंतर ते इतके प्रभावित झाले की, जेव्हा मी युद्धासंबंधी आणखीन आयती दाखवू लागलो तेव्हा त्यांनी मला मध्येच रोखले आणि म्हटले - मी समजलो त्या आयती विरोधकांच्या संबंधित आहेत.''

दुसरी घटना अशी की, माझी ही पुस्तिका 'अमारते शरिया' बिहार आणि ओरिसा यांनी प्रकाशित केली होती. शहरातील ज्या हिंदू बांधवांशी या संस्थेचा संबंध होता त्यांना प्रकाशनापूर्वी ही पुस्तिका दाखविण्यात आली. ते म्हणाले, ''ही पुस्तिका प्रकाशित केली जावी, ती आपल्या विषयात परिपूर्ण आहे.''

या दोन्ही घटनांवरून आम्हाला विश्वास वाटतो की, न्यायशील व शुद्धहृदयी हिंदू बांधव या पुस्तिकेपासून योग्य तो प्रभाव ग्रहण करतील.

प्रकरण ३

## धार्मिक स्वातंत्र्य

पैगंबर मुहम्मद (स.) आणि त्यांच्या उत्तराधिकाऱ्यांच्या काळात मुस्लिमेतरांशी अनेक वेळा मैत्रीपूर्ण करार झाले आणि त्यांच्याकरिता प्रतिज्ञापत्र लिहिले गेले. आम्ही त्यांच्या धार्मिक स्वातंत्र्यसंबंधी प्रतिज्ञापत्रातील काही अंश इथे देत आहोत.

माह दीनदारच्या रहिवाशांना लिहिलेल्या प्रतिज्ञापत्रात म्हटले होते -

''त्यांचा धर्म बदलला जाणार नाही आणि त्यांच्या धार्मिक कार्यातही हस्तक्षेप केला जाणार नाही.''

जुर्जानच्या रहिवाशांच्या प्रतिज्ञापत्रात म्हटले होते -

''त्यांचे प्राण, धन, धर्मशास्त्र सर्वांसाठी सुरक्षा आहे, त्यांच्या कोणत्याही गोष्टीत परिवर्तन केले जाणार नाही.''

लूकाफ व आजरबाईजान रहिवाशांच्या प्रतिज्ञापत्रात म्हटले होते -

''मुस्लिमेतरांचे प्राण, धन, धर्म आणि शास्त्र सर्वांकरिता संरक्षण आहे.''

या ओळी महान धर्मपंडित शिबली यांच्या 'अलफारुक' या पुस्तकातून उद्धृत करण्यात आल्या आहेत.

माननीय उमर (रजि.) यांच्या उपस्थितीत सीरिया (शाम) च्या रहिवाशांना लिहिण्यात आलेल्या प्रतिज्ञापत्रात म्हटले आहे,

''हे ते संरक्षण जे ईश्वराचे दास व मुस्लिमांचे सरदार (खलीफा) उमर यांनी सीरियाच्या रहिवाशांना दिले. हे संरक्षण त्यांच्या प्राण, धन, उपासनागृह, सूळ (येशू खिस्ताचा क्रूस), स्वास्थ्य, रोगी आणि त्यांच्या तमाम सहधर्मियांकरिता आहे. ते अशा प्रकारे असेल की त्यांच्या उपासनागृहांमध्ये वास्तव्य केले जाणार नाही, त्यांना कसल्याही प्रकारची क्षती पोहोचविली जाणार नाही. किंवा त्यांना पाडले जाणार नाही, त्यांच्या क्रूसांमध्ये व धनसंपत्तीमध्ये घट केली जाणार नाही आणि त्यांच्या धर्माच्या बाबतीत त्यांच्यावर कोणत्याही प्रकारचा दबाव आणला जाणार नाही.'' *(अलफ़ारुक़)*

ही काही विशेष उदारता नाही. धार्मिक स्वातंत्र्य आणि धार्मिक संरक्षण इस्लामी शासनाची स्थायी नीती होती. ही नीती पवित्र कुरआनच्या या आदेशावर

आधारित होती - ''धर्माच्या बाबतीत कोणत्याही प्रकारची जोर-जबरदस्ती नाही.'' माननीय उमर (रजि.) यांच्या शासनकाळात माननीय अम्र बिन आस यांनी इजिप्तवर विजय मिळविला. युद्धात अनेक सैनिकांना बंदी बनविण्यात आले होते. मिस्रविजेता अम्र बिन आस यांनी माननीय उमर (रजि.) यांना पत्राद्वारे विचारले की बंदीच्या बाबतीत काय केले जावे? उमर (रजि.) यांनी उत्तरादाखल लिहिले की, बंदीनी हवे तर इस्लाम स्वीकार करावा अथवा जिझिया देण्याचे मान्य करून आपल्या धर्माचे पालन करण्याचा, त्यांना अधिकार प्रदान करावा.'' *(अलफारुक- अल्लामा शिबली)*

माननीय उमर (रजि.) यांचा एक दास इसाई होता. एकदा त्यांनी आपल्या दासास मुस्लिम बनण्याचा प्रस्ताव सादर केला. त्याने तो प्रस्ताव अमान्य केला. माननीय उमर (रजि.) यांचे शासन, इराण, जॉर्डन व इजिप्तपर्यंत पसरले होते, परंतु त्यांनी दासाचे उत्तर ऐकून म्हटले, ''धर्माच्या बाबतीत सक्ती नाही.'' इतकेच नव्हे तर ते आपल्या दासावर नाराजही झाले नाहीत. आपल्या मृत्युसमयी त्यांनी आपल्या दासाला आलिंगन दिले आणि त्याला दासत्वातून मुक्त केले.

जॉर्डनमधील अंताकिया शहरातील याकूबी संप्रदायाचा पीटर यार्क मीकाईल लिहितो -

''रोमन जेथे जेथे वर्चस्व प्राप्त करील तेथे गिरजाघरांना अपवित्र करीत असत आणि आमच्यावर अत्याचार करीत असत. हा रोमनांचा अनर्थ जेव्हा ईश्वराने पाहिला तेव्हा त्याने या प्रदेशात इस्माईलची संततीला (मुस्लिमांना) आम्हाला रोमनांपासून मुक्ती देण्याकरिता नियुक्त केले.''

एक नस्तूरी उस्कुफ (धर्मनेता) म्हणतो,

''अरब मुस्लिम ख्रिश्चनांच्या धर्माशी लढत नाहीत, ते आमच्या पादरी व धार्मिक नेत्यांचा सन्मान आणि आमच्या धर्माचे रक्षण करतात, ते अतिशय उदार मताचे आहेत.''

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे तिसरे उत्तराधिकारी माननीय उस्मान (रजि.) यांच्या शासनकाळात गीसुजा, जो मरूचा पीटर यार्क होता, त्याने इराणच्या लॉर्ड बिशप सायमनला पत्र लिहिले की,

''अरब, ज्यांना ईश्वराने सध्या अनेक देशांची सत्ता दिली आहे, ख्रिश्ती धर्मावर

आक्रमण करीत नसून उलट आमच्या धर्माचे साहाय्य करतात. आणि आमच्या गिरजाघरांना आणि उपासनागृहांना अनुदान देतात.'' *(हुकूकुझ्झिम्मीयीन शिब्ली)*

इंग्लंडचे प्रसिद्ध विद्वान व लेखक - डॉ. ई. एफ. क्रॉसवेल आपल्या एका लेखात लिहितात, ''युद्ध मानवी जीवनाचा एक महत्त्वाचा भाग आहे आणि जीवनाच्या या क्षेत्रात नैतिक आदर्श अबाधित राखणे अतिशय कठीण असते. परंतु इस्लामने मानवी जीवनाच्या या क्षेत्रातदेखील फक्त उच्चकोटीची नैतिक शिकवणच ठेवली नसून व्यावहारिक स्वरुपातसुद्धा मुस्लिम हा आदर्श आपल्यासमोर ठेवत आले आहेत.

इस्लामने आक्रमणात्मक युद्धाच्या प्रत्येक अवस्थेस निषिद्ध ठरविले आहे आणि मुस्लिमांना केवळ प्रतिरक्षणात्मक युद्धाची अनुमती दिली आहे. परंतु अशा प्रकारच्या युद्धातदेखील नैतिकता व मानवतेच्या सीमोल्लंघनास कठोरपणे मनाई केली आहे. आणि केवळ त्याच लोकांवर शस्त्र चालविण्यास परवानगी दिली आहे जे मुस्लिमांशी लढतात आणि पराभूत झाल्यानंतरही शस्त्र खाली ठेवण्यास नकार देतात. त्याचप्रमाणे त्याने जीवनोपयोगी सामुग्री नष्ट करण्यासदेखील सर्वथा मनाई केली आहे.

युद्धाच्या बाबतीत जगातील कोणताही समुदाय नैतिकतेचा इतका मोठा आदर्श सादर करू शकत नाही. जितका इस्लामने सादर केला आहे. सारांश - इस्लामला कोणत्याही दिशेने पाहिले असता तो उच्चकोटीच्या नैतिक शिकवणींचा संग्रह असल्याचे सिद्ध होतो. त्याच्या शिकवणीचा सर्वात मोठा गुण म्हणजे त्यापासून मुस्लिम व मुस्लिमेतर दोघे समान स्वरुपात लाभ घेऊ शकतात.''

*(मासिक 'दीन-दुनिया' दिल्ली, जून १९६०)*

प्रकरण ४

# जिझिया

जिहादसारखाच जिझिया संदर्भातदेखील इस्लामच्या विरुद्ध खूप दुष्प्रचार करण्यात आला आहे. असा गैरसमज निर्माण करण्यात आला आहे की, जिझियाचा उद्देशदेखील करभार लादून मुस्लिमेतरांना इस्लाम स्वीकारण्यास बाध्य करणे हा आहे. प्रत्येक प्रकारच्या इस्लामविरोधी प्रचाराचा स्रोत खिस्ती संप्रदायच आहे. परंतु इंग्रजांचे शिष्य त्यांनी चावून चोथा केलेले गवत चावणारे आमच्या देशातील विद्वानांनीसुद्धा जिहाद व जिझिया संदर्भात अतिशय द्वेषपूर्वक प्रचार केला आहे. त्या विद्वानांमध्ये इंग्रज सरकारचे सेवक व सन्मानित मोघल इतिहासाचे प्रसिद्ध इतिहासकार 'सर यदुनाथ सरकार'सुद्धा होते. 'औरंगजेब' नावाचे त्यांचे एक पुस्तक आहे. त्यांना हिंदी भाषा अवगत नव्हती. परंतु त्यांच्याच इच्छेनुसार त्यांच्या एका शिष्याने त्यांच्या इंग्रजी पुस्तकाचा हिंदी अनुवाद करविला. त्यांच्या स्वीकृतीनंतर त्यांच्याच नावाने प्रकाशित करून घेतला आहे. कोणत्याही धर्माबाबतचे प्रमाण (विरोधकांनी लिहिलेली पुस्तके असू शकत नाहीत तर) त्याच धर्माची पुस्तके असू शकतात. मग ते कितीही विद्‌वान का असू नयेत. उदाहरणार्थ- वेदशास्त्रासंबंधी (इंग्लंडच्या विद्वानांनी लिहिलेली पुस्तके प्रमाण म्हणून गृहीत धरली जाणार नाहीत तर) काशी, अयोध्या, मथुरा इत्यादी ठिकाणच्या पंडितांची लिहिलेली पुस्तकेच प्रमाण म्हणून गृहीत धरली जातील. यदुनाथ सरकार यांनी उपरोक्त पुस्तकात इस्लामच्या बाबतीत जे काही लिहिले आहे त्याचा आधार इस्लामी पुस्तके नसून इस्लामचे शत्रू इंग्रजांची 'ह्युज' व 'एनसायक्लोपीडिया ऑफ इस्लाम' इत्यादी आहेत. इस्लामविरुद्ध भ्रम, घृणा व द्वेष निर्माण करण्याचा या पुस्तकांचा उद्देश होता. म्हणून थोडक्यात जिझियाची वस्तुस्थितीदेखील मुस्लिमेतर बांधवांसमोर सादर करण्याची आवश्यकता आहे.

सर्वप्रथम आपण जाणून घेऊ या की जिझिया मुस्लिमेतरांवरच का आहे?

१. मुस्लिमांवर एक धार्मिक अनिवार्य 'कर' लागू असतो त्यास 'जकात' म्हणतात. त्याचे प्रमाण वर्षाला अडीच टक्के असे आहे. हा कर शिलकीच्या धनसंपत्तीवर आकारला जातो. जर कुणी अब्जोपती असेल त्यालाही अडीच टक्क्यांच्या प्रमाणात प्रति वर्ष जकात द्यावी लागते. यदाकदाचित देशावर एखादे संकट आले तर इस्लामी शासन मुस्लिमांकडून त्यांच्या आर्थिक स्थितीनुसार विशेष धनदेखील प्राप्त करू शकते. परंतु मुस्लिमेतर रयतेकडून जिझियाव्यतिरिक्त एक पैसादेखील घेऊ शकत नाही.

२. मुस्लिमेतर प्रजा देशाच्या सुरक्षेच्या दायित्वातून मुक्त असते म्हणून सैनिकी खर्चासाठी तिच्याकडून क्षुल्लक देश सुरक्षाकर घेतला जातो, यालाच जिझिया म्हणतात. आवश्यकता भासल्यास जे मुस्लिमेतर स्वखुशीने सैनिकी सेवेत भाग घेतात त्यांच्याकडून जिझिया घेतला जात नाही. यदुनाथ सरकार यांनी याबाबतीत जे काही लिहिले आहे ते पूर्णत: खोटे आहे.

३. इस्लामी राज्यातील सर्व मुस्लिमेतर प्रजेवर जिझिया अनिवार्य असत नाही. इस्लामी राज्यातील मुस्लिमेतर प्रजा तीन प्रकारची असते. एक ते मुस्लिमेतर ज्यांनी एखाद्या कराराद्वारे इस्लामी राज्यात राहणे मान्य केले असेल. करारातील अटींनुसार इस्लामी शासन त्यांच्यासी व्यवहार करीत असते. जर करारात जिझियाची अट नसेल तर इस्लामी शासनास त्यांच्यावर जिझिया लागू करण्याचा अधिकार कदापि नाही. दुसरा प्रकार त्या मुस्लिमेतरांचा आहे ज्यांनी इस्लामी राज्याशी युद्ध केले असेल आणि युद्धात पराभूत झाले असतील, तसेच इस्लामी सेनेने त्यांच्या वस्तीवर व केंद्रावर ताबा मिळविला असेल. फक्त याच मुस्लिमेतरांकरिता असा नियम आहे की त्यांनी इस्लामचा स्वीकार केल्यास त्यांचे सर्व अधिकार इस्लामी समाजासमान होतील आणि स्वत:च्या धर्मानुसार राहू इच्छित असतील तर 'सुरक्षाकरा'च्या स्वरूपात त्यांच्यावर जिझिया लागू केला जाईल. तिसऱ्या प्रकारचे मुस्लिमेतर असे आहेत ज्यांनी वरील दोन्ही प्रकाराव्यतिरिक्त अन्य प्रकारे इस्लामी राज्याचे नागरिकत्व स्वीकारले असेल. उदाहरणार्थ- पाकिस्तानच्या मुस्लिमेतरांवर कोणत्याही प्रकारे जिझिया लागू केला जाऊ शकत नाही. कारण ते युद्धातही पराभूत झालेले नाहीत आणि ते जिझियाचा स्वीकार करून पाकिस्तानचे नागरिकही बनलेले नाहीत. ते मुळातच पाकिस्तानचे नागरिक आहेत.

इस्लामी परिभाषेत तिन्ही प्रकारच्या मुस्लिमेतर जनतेस 'जिम्मी' असे म्हणतात. जिम्मी हा अपमानास्पद शब्द नाही. याचा अर्थ असा आहे की- ते मुस्लिमेतर ज्यांच्या प्राण, धन, धर्म, सन्मान, सुख, शांती सर्वांच्या संरक्षाणास इस्लामी शासन जबाबदार असते. इतकेच नव्हे तर व्यावहारिक दृष्टीने मुस्लिमेतराच्या सर्व प्रकारच्या सुरक्षेचे दायित्व इस्लामी शासनावर असते. परंतु इस्लामनुसार मुस्लिमेतरांच्या संरक्षणाची वास्तविक जबाबदारी अल्लाह व पैगंबरांवर असते. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी फर्माविले आहे.

"खबरदार! जो कोणी मुस्लिमेतर प्रजेवर अत्याचार करील अथवा त्यांच्या अधिकारात घट करील वा त्याच्यावर त्याच्या शक्तीपेक्षा जास्त कोणत्याही प्रकारचा भार टाकील किंवा तिच्या अनुमतीविना त्याची एखादी वस्तू घेईल. तर अंतिम निवाड्याच्या दिवशी त्याच्याविरुद्ध मुस्लिमेतर प्रजेतर्फे ईश्वरासमोर मी फिर्यादी म्हणून उभा राहीन."

मुस्लिमेतर बांधवांनी पैगंबर मुहम्मद (स.) या (मुस्लिमांना दिलेल्या) या चेतावणीवर गांभीर्यपूर्वक विचार करावा. अशा प्रकारच्या संरक्षणाची गॅरंटी आम्हा भारतीय जनतेलादेखील मिळालेली नाही. सांप्रदायिक दंगलीत मुस्लिमांशी काय केले जाते?

४. जिझियाचे प्रमाण असे आहे- श्रीमंत असो वा अति श्रीमंत, मग तो लक्षाधीश असो वा अब्जाधीश- त्यास प्रति व्यक्ती १२ रुपये, मध्यम वर्गास ६ रुपये, व्यापारी आणि नोकरपेशा वर्गास ३ रुपये प्रति वर्ष. जिझियाबाबत मूळ सिद्धान्त असा आहे की, याच संपत्तीच्या प्रमाणानुसार जिझिया घेतला जावा जी आवश्यकतेपेक्षा अधिक असेल. जर एखाद्या मुस्लिमेतर नागरिकाच्या उत्पन्नात घट झाल्यास त्याच्याकडून तीन रुपयांपेक्षाही कमी कर घेतला जाईल, परंतु उत्पन्नात वाढ झाल्यास जिझियामध्ये वाढ करता येत नाही.

५. ज्यांच्यावर जिझिया लागू आहे त्यांच्यापैकी स्त्रिया, बालक, वेडा, अंध-विकलांग, मंदीर व पूजागृहांचे सेवक, साधू-समाज, गृहस्थ, कौटुंबिक जीवनापासून अलिप्त होऊन गुहेत व मठांमध्ये राहणारे लोक इ. जिझिया करातून मुक्त असतात.

६. जिझिया देण्याकरिता अधिकाऱ्यांकडे जाण्याचा नियम नाही अधिकाऱ्यांना वसुलीकरिता स्वत:जावे लागते. जिझिया वसुलीच्या अधिकाऱ्याने नम्रतेने वागण्याचा त्यांना आदेश दिलेला असतो. त्यांनी कठोरपणे वागू नये. त्यांची वस्त्रे इत्यादी गरजेच्या वस्तूंचा लिलाव करू नये.

७. गरीब व भिक्षा मागणाऱ्या मुस्लिमेतरांचा सरकारी खजिन्यावरदेखील अधिकार आहे. यदुनाथ सरकार यांच्या 'औरंगजेब' या पुस्तकात या नियमांबाबत कसलीही चर्चा करण्यात आलेली नाही. जर जिझिया मुस्लिमेतरांना अपमानित करण्यासाठी असता तर मंदिरांचे पुजारी, साधू, संन्यासी, मठांमध्ये व गुहेत राहणारे, तसेच स्त्रिया, मुले, वृद्ध आणि गरीब यांना जिझियातून मुक्त करण्यात आले नसते.

या गोष्टीचा आम्ही याच पुस्तिकेच वर असा उल्लेख केला आहे की, इस्लामी राज्यात मुस्लिमेवर प्रजेस प्राण, धन, धर्म, सन्मान सर्वांची संपूर्ण सुरक्षा लाभत असते. या ठिकाणी आम्ही इतकेच सांगू इच्छितो की, इस्लामी व्यवस्था मानवाने बनविलेल्या व्यवस्थेनुसार नसते, तर ईशग्रंथ कुरआन आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आदेशांवर आधारित असते. म्हणूनच जसे इतर ईशआज्ञेची व पैगंबर (स.) यांच्या आदेशांची अवज्ञा करणे पाप आहे तसे इस्लामी व्यवस्थेची अवहेलना करणे हेसुद्धा पाप आहे.

वस्तुस्थितीच्या विरुद्ध कितीही प्रचार करण्यात आला तरी ती आपली वास्तविकता समजाविल्याशिवाय राहात नाही. पाश्चिमात्य विद्वानांमध्येदेखील असे

विद्वान आहेत. ज्यांनी दुराग्रहाच्या दुष्प्रचारांचे खंडन केले आहे. सर यदुनाथ सरकार यांच्यासारख्या विद्वानांना इंग्रजांच्या राजकारणानुसार इस्लाम व मुस्लिमांच्या विरुद्ध दुष्प्रचार करायचा होता, ते अशा विद्वानांच्या पुस्तकांचे अध्ययन का करतील ज्यांनी दुष्प्रचाराचे खंडन केले आहे? पाहा -

मिस्टर हालम आपला ऐतिहासिक ग्रंथ 'इंग्रजी साम्राज्य व्यवस्था' भाग १, अध्याय २ मध्ये लिहितात,

''इस्लाम धर्म लोकांसमोर सादर करण्यात आला, परंतु लोकांवर इस्लाम बळपूर्वक कधीही लादण्यात आलेला नाही. ज्या व्यक्तीने या धर्मास प्रसन्न हृदयाने स्वीकारले त्यास तेच अधिकार प्रदान करण्यात आले जे विजयी समुदायाचे होते. या धर्माने जिंकलेल्या समुदायांना त्या अटींवर मुक्त केले ज्या अटी विश्वाच्या आरंभापासून इस्लामच्या पैगंबरांपर्यंत प्रत्येक विजेत्याने जिंकले त्यांच्यावर लागू केल्या होत्या. इस्लामी नियमानुसार इस्लामी राज्याच्या अधीन व आज्ञाधारक असलेल्या अन्य धर्मियांना (धर्मात सक्ती नाही) एक उघड प्रमाण व एक अतुट तर्क असलेल्या दाव्यानुसार सर्व प्रकारचे धार्मिक स्वातंत्र्य प्रदान केले. इस्लाममध्ये अन्य धर्मियांना धार्मिक स्वातंत्र्य देणे आणि त्यांच्याशी सद्व्यवहार करण्याच्या आज्ञेसंबंधी ही आयत कोणा वेड्याच्या तोंडचे बरळणे किंवा एखाद्या दार्शनिकाचे बिनबुडाचे विचार नाहीत. हे त्या व्यक्तीचे कथन आहे जी अशा साम्राज्याची शासक होती जी इतकी शक्ती बाळगत होती आणि जिची व्यवस्था इतकी उत्तम होती की त्याने इच्छिले तो नियम जारी करू शकत होती. धर्मात व सांस्कृतिक राजकारणातसुद्धा अनेक व्यक्तींनी व संप्रदायांनी धार्मिक स्वातंत्र्य प्रदान करण्याचे प्रलोभन दिले आहे, परंतु ते कार्यान्वित करण्याची ताकीद जोपर्यंत ते विवश व निर्बळ असतील तोपर्यंतच असेल. परंतु इस्लामच्या पैगंबरांनी धार्मिक स्वातंत्र्य देण्याचे प्रलोभनच दिले नसून त्यास धार्मिक नियमांशीदेखील संमीलित केले. मुस्लिमांच्या राज्यात व अधिकारात असलेल्या प्रत्येक समुदायास दया व प्रेम करण्याचा सिद्धान्त संमीलित करण्यात आला. प्रत्येक समुदायकडून त्याचे आपले धार्मिक विधी आणि कार्य कोणत्याही प्रकारच्या आडकाठीविना पार पाडण्याचा पारिश्रमिक नाममात्र कर च्या स्वरूपात घेण्यात आला. जेव्हा एक कर निश्चित केला जातो तेव्हा त्या समुदायाच्या धार्मिक विधी व कार्यात हस्तक्षेप करणे पूर्णता धर्मविरुद्ध व निषिद्ध समजले जात होते.''

प्रसिद्ध फ्रांसीसी विदवान डॉ. लीबान लिहितात,

''आम्ही ज्या वेळी अरबांच्या विजयावर दृष्टी टाकू आणि त्यांच्या यशाची कारणे शोधण्याचा प्रयत्न करू तेव्हाच स्पष्ट होईल की धर्माच्या प्रचारात तलावारीचा अजिबात वापर करण्यात आलेला नाही. कारण मुस्लिम नेहमीच पराभूत समुदायास

आपल्या धर्मांच्या आचरणाबाबत स्वातंत्र्य प्रदान करीत होते. ख्रिस्ती समुदायांनी आपल्या विजेत्यांच्या धर्माचा स्वीकार करून शेवटी त्यांची भाषादेखील ग्रहण केली. त्याचे मुख्य कारण असे की त्यांना आपल्या नवीन शासकांत आपल्या जुन्या शासकांपेक्षा अधिक सत्यता व सरलता आढळून आली होती.''

आणखी एके ठिकाणी हाच इतिहासकार लिहितो,

''मुस्लिम खलीफांनी (पैगंबर मुहम्मद (स.) यांचे उत्तराधिकारी चार शासक) प्रांतीय उद्देशापोटी कदापि तलवारीद्वारे धर्म प्रसार करण्याचा प्रयत्न केला नाही. हे वारंवार म्हटले जाते की ते बळजबरीने आपल्या धर्माचा प्रचार करीत होते. याच्या विपरीत ते पूर्णतः स्पष्ट करीत असत की, पराभूत समुदायांचे धर्म, संस्कार आणि वेशभूषा यांचा आदर राखला जाईल आणि या स्वातंत्र्याच्या बदल्यात ते त्यांच्याकडून एक क्षुल्लक असा कर (जिझिया) घेत होते. हा कर त्यांचे पूर्वीचे शासक त्यांच्याकडून घेत असलेल्या करापेक्षा फारच कमी होता.''

आणखी एके ठिकाणी डॉ. लीबान यांनी लिहिले आहे,

''अरबांच्या शासनकाळात ख्रिश्चनांना धर्म, रीतीरिवाज आणि नियमांचे पूर्ण स्वातंत्र्य लाभले होते. पलरमांचे गिरजाघर, सेंट कॅथरीनचे पादरी व ख्रिस्ती संन्यासी करादीन लिहितात की पादरींना आपले धार्मिक वस्त्र परिधान करून रुग्णांची विचारपूस करण्यास जाण्यांचे पूर्ण स्वातंत्र्य होते. एक दुसरे पादरी मोरकोली वर्णन करतात की- सेनेमध्ये संपूर्ण धार्मिक संस्कारानिशी दोन धार्मिक ध्वज उभे केले जात असत. एक ध्वज मुस्लिमांचा ज्याचा रंग हिरवा होता आणि त्यावर काळा बुरुज कोरलेला असे तर दुसरा लाल रंगाचा ध्वज ख्रिश्चनांचा होता. या ध्वजावर सोनेरी रंगाचा क्रूस काढलेला असे. मुस्लिमांच्या विजयाच्या वेळी जितके चर्च होते ते सर्वच्या सर्व जसेच्या तसे अबाधित ठेवण्यात आले.''

हाच इतिहासकार दुसऱ्या ठिकाणी लिहितो, ''अरब शासनकाळात मोठ्या संख्येने चर्चची निर्मिती होणे हा याच गोष्टीचा पुरावा आहे की, ते पराभूत समुदायांच्या धर्माचा किती आदर करीत होते.

अनेक ख्रिश्चन मुस्लिम बनले परंतु इस्लाम स्वीकारण्याची विशिष्ट कारणे नव्हती, कारण अरबांच्या शासनकाळात ख्रिश्चनसुद्धा ज्यांना मुस्लिम म्हणत होते आणि ज्यू (यहुदी) मुस्लिमांच्या शासनातील सर्व प्रकारे बरोबर होते आणि त्यांनादेखील पदे मिळू शकत होती.''

या दोन्ही विद्वानांनी सादर केलेल्या उदाहरणांमुळे सर यदुनाथ सरकारद्वारा करण्यात आलेल्या दुष्प्रचाराचे पूर्णतः खंडन होते.

आता एका भारतीय विद्वानाचे समीक्षण पाहा - डॉ. ईश्वर टोपा, एम.ए., डी.लिट लिहितात,

''जिझिया लागू करण्याच्या आणि मंदिरे पाडण्याच्या घटनांपासून जे मिथ्या निष्कर्ष काढले जातात ते मी स्पष्ट करू इच्छितो.

हिंदू जनतेला आर्थिक दासत्वात अडकविण्याकरिता (जिझिया) लागू करण्यात आला होता, असे म्हटले जाते. अशा दाव्यांच्या विद्वत्तापूर्ण समीक्षणाची गरज आहे.

इस्लामी शास्त्राच्या परिभाषेत मुस्लिमेतर केवळ एक सर्वसाधारण कर देऊन, ज्यास 'जिझिया' म्हटले जाते, इस्लामी राज्याच्या संरक्षणात येतात. प्रत्येक मुस्लिमांस सैनिकी सेवेकरिता बाध्य केले जाऊ शकते, परंतु मुस्लिमेतर जिझिया देऊन सैनिकी सेवेपासून मुक्त होतो. त्याचप्रमाणे जिझिया भरणाऱ्या मुस्लिमेतरांचे प्राण, धन आणि त्यांचे धार्मिक स्वातंत्र्य अर्थात त्यांच्या रीती-परंपरेनुसार पूजागृहांमध्ये पूजापाठाचे इस्लामी राज्य संरक्षक असते. इस्लामी राज्य आपल्या नियमांनुसार बांधील असते. इस्लामी नियम त्यास मुस्लिमेतरांच्या धार्मिक कृत्यात हस्तक्षेप करण्याचा अधिकार देत नाही. मग तो मंदिरांना कसे तोडू शकतो? इस्लामी राज्य जेव्हा आपले दायित्व पार पाडतो तेव्हा मुस्लिमेतरांना इस्लामी राज्यावर त्याचे दायित्व आपोआपच लागू होते. हाच इस्लाम धर्मामध्ये जिझियाचा सिद्धान्त आहे.

इस्लामी राज्याची आणखी एक भक्कम बाजू आहे ज्याकडे सहसा लक्ष दिले जात नाही. जिझिया सर्वच मुस्लिमेतरांना लागू केला जात नाही. अधिकतर लोक यापासून मुक्त असतात. स्त्रिया, बालके, वृद्ध, पुजारी, विद्यार्थी, बेरोजगार, निर्धन आणि भिकारी यांना जिझिया द्यावा लागत नाही. यावरून हेच सिद्ध होते की कमीतकमी ७५ टक्के मुस्लिमेतर जिझियापासून मुक्त असतात. कारण समाजात अशाच प्रकारच्या व्यक्तींची संख्या जास्त असते.''

विद्वान लेखकाने पुढे म्हटले आहे की, ''भारतातील सुरूवातीचे मुस्लिम राज्य इस्लामी राजकारणाचा आदर्श होता. या राज्याने मुस्लिमेतरांना न्यायपूर्वकच नव्हे तर उदारतापूर्वकदेखील वागणूक दिली. अशा वागणुकीमुळे प्रसन्न होऊन स्वतः मुस्लिमेतरांनी आपल्या शासनाचा पाया भक्कम केला त्यांच्यानंतर जे शासक झाले त्यांचे शासन वास्तविक इस्लामी शासन नव्हते. म्हणून त्यांच्या शासनाचा दोष इस्लामवर येत नाही.'' *(मासिक 'नई जिन्दगी', ऑक्टोबर १९४६, अलहाबाद)*

ईश्वरापाशी प्रार्थना आहे की, ''आमचा प्रयत्न यशस्वी होवो, जिहाद आणि जिझिया विषयक भ्रमांचे निवारण होवो.''

(तथास्तु)